पैसारु । मजहीसकट महापूरु । नेत आहे ।। १९ ।। ऐसा श्रीकृष्णार्जुन- । संवादसंगमीं स्नान । करूनि देतसे तिळदान । अहंतेचें ।। १६२० ।। तेथ असंवरें आनंदें । अलौकिकही कांहीं स्फुंदें । श्रीकृष्ण म्हणे सद्गदें । वेळोवेळां ।। २१ ।। या अवस्थांची कांहीं । कौरवांतें परी नाहीं । म्हणौनि रायें तें कांहीं । कल्पावें जंव ।। २२ ।। तंव जाला सुखलाभु । आपणपां करूनि स्वयंभु । बुझाविला अवष्टंभु । संजयें तेणें ।। २३ ।। तेथ कोणी येकी अवसरी । होआवी ते करूनि दुरी । रावो म्हणे संजया परी । कैशी तुझी गा ।। २४ ।। तेणें तूंतें येथें व्यासें । बैसविलें कासया उद्देशें । अप्रसंगामाजीं ऐसें । बोलसी काई ।। २५ ।। रानींचें राउळा नेलिया । दाही दिशा मानी सुनिया । कां रात्री होय पाहलया । निशाचरां ।। २६ ।। जो जेथिंचें गौरव नेणें । तयासि तें भिगुळवाणें । म्हणौनि अप्रसंगु तेणें । म्हणावा कीं तो ।। २७ ।। मग म्हणे सांगें प्रस्तुत । उदयलेसें जें उत्कळित । तें कोणासि बा रे जैत । देईल शेखीं ।। २८ ।। एऱ्हवीं विशेषें बहुतेक । आमुचें ऐसें मानसिक । जे दुर्योधनाचे अधिक । प्रताप सदा ।। २९ ।। आणि येरांचेनि पाडें । दळही याचें देव्हडें । म्हणौनि जैत फुडें । आणील ना तें ।। १६३० ।। आम्हां तंव गमे ऐसें । मा तुझें ज्योतीष कैसें । तें नेणों संजया असे । तैसें सांग पां ।। ३१ ।।

यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ।। ७८ ।।

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'मोक्षसंन्यासयोगो' नाम अष्टादशोऽध्यायः ।। १८ ।।

यया बोला संजयो म्हणे । जी येरयेरांचें मी नेणें । परी आयुष्य तेथें जिणें । हें फुडें कीं गा ।। ३२ ।। चंद्रु तेथें चंद्रिका । शंभु तेथें अंबिका । संत तेथें विवेका । असणें कीं जी ।। ३३ ।। रावो तेथें कटक । सौजन्य तेथें सोयरीक । वन्हि तेथें दाहक । सामर्थ्य कीं ।। ३४ ।। दया तेथें धर्मु । धर्मु तेथें सुखागमु । सुखीं पुरुषोत्तमु । असे जैसा ।। ३५ ।। वसंतु तेथें वनें । वन तेथें सुमनें । सुमनीं पालिंगनें । सारंगांचीं ।। ३६ ।। गुरु तेथ ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन । दर्शनीं समाधान । आथी जैसें ।। ३७ ।। भाग्य तेथ विलासु । सुख तेथ उल्लासु । हें असो तेथ प्रकाशु । सूर्य जेथें ।। ३८ ।। तैसें सकल पुरुषार्थ । जेणें

स्वामी का सनाथ । तो श्रीकृष्णरावो जेथ । तेथ लक्ष्मी ॥ ३९ ॥ आणि आपुलेनि कांतेंसीं । ते जगदंबा जयापासीं । अणिमादिकीं काय दासी । नव्हती तयातें ॥ १६४० ॥ कृष्ण विजयस्वरूप निजांगें । तो राहिला असे जेणें भागें । तें जयो लागवेगें । तेथेंचि आहे ॥ ४१ ॥ विजयो नामें अर्जुन विख्यातु । विजयस्वरूप श्रीकृष्णनाथु । श्रियेसीं विजय निश्चितु । तेथेंचि असे ॥ ४२ ॥ तयाचिये देशींच्या झाडीं । कल्पतरूतें होडी । न जिणावें कां येवढीं । मायबापें असतां ॥ ४३ ॥ ते पाषाणही आघवे । चिंतारत्नें कां नोहावें । तिये भूमिके कां न यावें । सुवर्णत्व ॥ ४४ ॥ तयाचिया गांवींचिया । नदी अमृतें वाहाविया । नवल कायि राया । विचारीं पां ॥ ४५ ॥ तयाचे बिसाट शब्द । सुखें म्हणों येती वेद । सदेह सच्चिदानंद । कां न व्हावे ते ॥ ४६ ॥ पैं स्वर्गापवर्ग दोन्ही । इयें पदें जया अधीनीं । तो श्रीकृष्ण बाप जननी । कमळा जया ॥ ४७ ॥ म्हणौनि जिया बाहीं उभा । तो लक्ष्मीयेचा वल्लभा । तेथें सर्वसिद्धी स्वयंभा । येर मी नेणें ॥ ४८ ॥ आणि समुद्राचा मेघु । उपयोगें तयाहूनि चांगु । तैसा पार्थी आजि लागु । आहे तये ॥ ४९ ॥ कनकत्वदीक्षागुरू । लोहा परिसु होय कीरू । परी जगा पोसिता व्यवहारू । तेंचि जाणें ॥ १६५० ॥ येथ गुरुत्वा येतसे उणें । ऐसें झणें कोण्ही म्हणे । वन्हि प्रकाश दीपपणें । प्रकाशी आपुला ॥ ५१ ॥ तैसा देवाचिया शक्ती । पार्थु देवासीचि बहुती । परी माने इये स्तुती । गौरव असे ॥ ५२ ॥ आणि पुत्रें मी सर्व गुणीं । जिणावा हे बापा शिराणी । तरी ते शाङ्र्गपाणी । फळा आली ॥ ५३ ॥ किंबहुना ऐसा नृपा । पार्थु जालासे कृष्णकृपा । तो जयाकडे साक्षेपा । रीति आहे ॥ ५४ ॥ तोचि गा विजयासि ठावो । येथ तुज कोण संदेहो । तेथ न ये तरी वावो । विजयोचि होय ॥ ५५ ॥ म्हणौनि जेथ श्री तेथें श्रीमंतु । जेथ तो पंडूचा सुतु । तेथ विजय समस्तु । अभ्युदयो तेथ ॥ ५६ ॥ जरी व्यासाचेनि साचें । धिरे (मानी) मन तुमचें । तरी या बोलाचें । ध्रुवचि माना ॥ ५७ ॥ जेथ तो श्रीवल्लभु । जेथ भक्तकदंबु । तेथ सुख आणि लाभु । मंगळाचा ॥ ५८ ॥ या बोला आन होये । तरी व्यासाचा अंकु न वाहे । ऐसें गाजोनि बाहें । उभिली तेणें ॥ ५९ ॥ एवं भारताचा आवांका । आणूनि श्लोका येका । संजयें कुरुनायका । दीधला हातीं ॥ १६६० ॥

जैसा नेणों केवढा वन्ही । परी गुणाग्रीं ठेऊनी । आणिजे सूर्याची हानी । निस्तरावया ।। ६१ ।। तैसें शब्दब्रह्म अनंत । जालें सवालक्ष भारत । भारताचें शतें सात । सर्वस्व गीता ।। ६२ ।। तयाही सातां शतांचा । इत्यर्थु हा श्लोक शेषींचा । व्यासशिष्य संजयाचा । पूर्णोद्गारु जो ।। ६३ ।। येणें येकेंचि श्लोकें । राहे तेणें असकें । अविद्याजाताचें निकें । जितलें होय ।। ६४ ।। ऐसें श्लोक शतें सात । गीतेचीं पदें आंगें वाहत । पदें म्हणों कीं परमामृत । गीताकाशींचें ।। ६५ ।। कीं आत्मराजाचिये सभे । गीते वोडवले हे खांबे । मज श्लोक प्रतिभे । ऐसे येत ।। ६६ ।। कीं गीता हे सप्तशती । मंत्रप्रतिपाद्य भगवती । मोहमहिषा मुक्ति । आनंदली असे ।। ६७ ।। म्हणौनि मनें कायें वाचा । जो सेवकु होईल इयेचा । तो स्वानंदसाम्राज्याचा । चक्रवर्ती करी ।। ६८ ।। कीं अविद्यातिमिररोंखें । श्लोक सूर्यतें पैजा जिंके । ऐसे प्रकाशिले गीतामिषें । रायें श्रीकृष्णें ।। ६९ ।। कीं श्लोकाक्षरद्राक्षलता । मांडव जाली आहे गीता । संसारपथश्रांता । विसंवावया ।। १६७० ।। कीं सभाग्यसंतीं भ्रमरीं । केले ते श्लोककल्हारीं । श्रीकृष्णाख्यसरोवरीं । सासिन्नली हे ।। ७१ ।। कीं श्लोक नव्हती आन । गमे गीतेचें महिमान । वाखाणिते बंदिजन । उदंड जैसे ।। ७२ ।। कीं श्लोकांचिया आवारा । सात शतें करूनि सुंदरा । सर्वागम गीतापुरा । वसों आले ।। ७३ ।। कीं निजकांता आत्मया । आवडो गीता मिळावया । श्लोक नव्हती बाह्या- । पसरु का जो ।। ७४ ।। कीं गीताकमळींचे भृंग । कीं हे गीतासागरतरंग । कीं हरीचे हे तुरंग । गीतारथींचे ।। ७५ ।। कीं श्लोक सर्वतीर्थ संघातु । आला श्रीगीतेगंगे आंतु । जे अर्जुन नर सिंहस्थु । जाला म्हणौनि ।। ७६ ।। कीं नोहे हे श्लोकश्रेणी । अचिंत्यचिंर्त्तांचतामणी । कीं निर्विकल्पां लावणी । कल्पतरूंची ।। ७७ ।। ऐसिया शतें सात श्लोकां । परी आगळा येकयेका । आतां कोण वेगळिका । वानावा पां ।। ७८ ।। तान्ही आणि पारठी । इया कामधेनूतें दिठी । सूनि जैसिया गोठी । कीजती ना ।। ७९ ।। दीपा आगिलु मागिलु । सूर्यु धाकुटा वडीलु । अमृतसिंधु खोलु । उथळु कायसा ।। १६८० ।। तैसे पहिले सरते । श्लोक न म्हणावे गीते । जुनीं नवीं पारिजातें । आहाती काई ।। ८१ ।। आणि श्लोका पाडु नाहीं । हें कीर समर्थु काई । येथ

वाच्यवाचकही । भागु न धरी ।। ८२ ।। जे इये शास्त्रीं येकु । श्रीकृष्णचि वाच्य वाचकु । हें प्रसिद्ध जाणे लोकु । भलताही ।। ८३ ।। येथें अर्थें तेंचि पाठें । जोडे येवढेनि धटें । वाच्यवाचक येकवटें । साधितें शास्त्र ।। ८४ ।। म्हणौनि मज कांहीं । समर्थनीं आतां विषय नाहीं । गीता जाणा हे वाङ्मयी । श्रीमूर्ति प्रभूची ।। ८५ ।। शास्त्र वाच्यें अर्थें फळे । मग आपण मावळे । तैसें नव्हे हें सगळें । परब्रह्मचि ।। ८६ ।। कैसा विश्वाचिया कृपा । करूनि महानंद सोपा । अर्जुनव्याजें रूपा । आणिला देवें ।। ८७ ।। चकोराचेनि निमित्तें । तिन्ही भुवनें संतप्तें । निववीलीं कळावंतें । चंद्रें जेवीं ।। ८८ ।। कां गौतमाचेनि मिषें । कळिकाळज्वरितोद्देशें । पाणिढाळु गिरीशें । गंगेचा केला ।। ८९ ।। तैसें गीतेचें हें दुभतें । वत्स करूनि पार्थातें । दुभीनली जगापुरतें । श्रीकृष्ण गाय ।। १६९० ।। येथें जीवें जरी नाहाल । तरी हेंचि कीर होआल । नातरी पाठमिषें तिंबाल । जीभचि जरी ।। ९१ ।। तरी लोह एकें अंशें । झगटलिया परिसें । येरीकडे अपैसें । सुवर्ण होय ।। ९२ ।। तैसी पाठाची ते वाटी । श्लोकपाद लावा ना जंव वोठीं । तंव ब्रह्मतेची पुष्टी । येईल आंगा ।। ९३ ।। ना येणेसीं मुख वांकडें । करूनि ठाकाल कानवडें । तरी कानींहि घेतां पडे । तेचि लेख ।। ९४ ।। जे हे श्रवणें पाठें अर्थें । गीता नेदी मोक्षाआरौतें । जैसा समर्थु दाता कोण्हातें । नास्ति न म्हणे ।। ९५ ।। म्हणौनि जाणतया सवा । गीताचि येकी सेवा । काय कराल आघवां । शास्त्रीं येरीं ।। ९६ ।। आणि कृष्णार्जुनीं मोकळी । गोठी चावळिली जे निराळीं । ते श्रीव्यासें केली करतळीं । घेवों ये ऐसी ।। ९७ ।। बाळकातें वोरसें । माय जैं जेवऊं बैसे । तैं तया ठाकती तैसे । घांस करी ।। ९८ ।। कां अफाटा समीरणा । आपैतेंपण शाहाणा । केलें जैसें विंजणा । निर्मूनियां ।। ९९ ।। तैसें शब्दें जें न लभे । तें घडूनियां अनुष्टुभें । स्त्रीशूद्रादि प्रतिभे । सामाविलें ।। १७०० ।। स्वातीचेनि पाणियें । न होती जरी मोतियें । तरी अंगीं सुंदरांचिये । कां शोभिती तियें ।। १ ।। नादु वाद्या न येतां । तरी कां गोचरु होता । फुलें न होतां घेपता । आमोदु केवीं ।। २ ।। गोडीं न होती पक्वान्नें । तरी कां फावती रसनें । दर्पणावीण नयनें । नयनु कां दिसे ।। ३ ।। द्रष्टा श्रीगुरुमूर्ती । न रिगता दृश्यपंथीं । तरी कां ह्या उपास्ती । आकळता तो ।। ४ ।। तैसें वस्तु जें

असंख्यात । तया संख्या शतें सात । न होती तरी कोणा येथ । फावों शकतें ।। ५ ।। मेघ सिंधूचें पाणी वाहे । तरी जग तयातेंचि पाहे । कां जें उमप ते नोहें । ठाकतें कोण्हा ।। ६ ।। आणि वाचा जें न पवे । तें हे श्लोक न होते बरवे । तरी कानें मुखें फावे । ऐसें कां होतें ।। ७ ।। म्हणौनि श्रीव्यासाचा हा थोरु । विश्वा जाला उपकारु । जे श्रीकृष्ण उक्ती आकारु । ग्रंथाचा केला ।। ८ ।। आणि तोचि हा मी आतां । श्रीव्यासाचीं पदें पाहतां पाहतां । आणिला श्रवणपथा । मऱ्हाठिया ।। ९ ।। व्यासादिकांचे उन्मेख । राहाटती जेथ साशंक । तेथ मीही रंक एक । चावळी करीं ।। १७१० ।। परी गीता ईश्वरु भोळा । ले व्यासोक्तिकुसुममाळा । तरी माझिया दूर्वादळा । ना न म्हणे कीं ।। ११ ।। आणि क्षीरसिंधूचिया तटा । पाणिया येती गजघटा । तेथ काय मुरकुटा । वारिजत असे ।। १२ ।। पांख फुटे पांखिरूं । नुडे तरी नभींच स्थिरू । गगन आक्रमी सत्वरू । तो गरुडही तेथ ।। १३ ।। राजहंसाचें चालणें । भूतळीं जालिया शाहाणें । आणिकें काय कोणें । चालावेचिना ।। १४ ।। जी आपुलेनि अवकाशें । अगाध जळ घेपे कलशें । चुळीं चूळपणा ऐसें । भरूनि न निघे ।। १५ ।। दिवटीच्या आंगीं थोरी । तरी ते बहु तेज धरी । वाती आपुलिया परी । आणीच कीं ना ।। १६ ।। जी समुद्राचेनि पैसें । समुद्रीं आकाश आभासे । थिल्लरीं थिल्लाराऐसें । बिंबेचि पैं ।। १७ ।। तेवीं व्यासादिक महामती । वावरों येती इये ग्रंथीं । मा आम्ही ठाकों हे युक्ती । न मिळे कीर ।। १८ ।। जिये सागरीं जळचरें । संचरती मंदराकारें । तेथ देखोनि शफरें येरें । पोहों न लाहती ।। १९ ।। अरुण आंगाजवळिके । म्हणौनि सूर्यातें देखे । मा भूतळींची न देखे । मुंगी काई ।। १७२० ।। यालागीं आम्हां प्राकृतां । देशिकारें बंधें गीता । म्हणणें हें अनुचिता । कारण नोहे ।। २१ ।। आणि बापु पुढां जाये । ते घेत पाउलाची सोये । बाळ ये तरी न लाहे । पावों कायी ।। २२ ।। तैसा व्यासाचा मागोवा घेतु । भाष्यकारातें वाट पुसतु । अयोग्यही मी न पवतु । कें जाईन ।। २३ ।। आणि पृथ्वी जयाचिया क्षमा । नुबगे स्थावर जंगमा । जयाचेनि अमृतें चंद्रमा । निववी जग ।। २४ ।। जयाचें आंगिक असिकें । तेज लाहोनि अर्कें । आंधाराचें सावाइकें । लोटिजत आहे ।। २५ ।। समुद्रा जयाचें

तोय । तोया जयाचें माधुर्य । माधुर्या सौंदर्य । जयाचेनि ॥ २६ ॥ पवना जयाचें बळ । आकाश जेणें पघळ । ज्ञान जेणें उज्ज्वळ । चक्रवर्ती ॥ २७ ॥ वेद जेणें सुभाष । सुख जेणें सोल्लास । हें असो रूपस । विश्व जेणें ॥ २८ ॥ तो सर्वोपकारी समर्थु । सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथु । राहाटत असे मजही आंतु । रिघोनियां ॥ २९ ॥ आतां आयती गीता जगीं । मी सांगें मऱ्हाठिया भंगीं । येथ कें विस्मयालागीं । ठावो आहे ॥ १७३० ॥ श्रीगुरुचेनि नांवें माती । डोंगरीं जयापासीं होती । तेणें कोळियें त्रिजगतीं । येकवद केली ॥ ३१ ॥ चंदनें वेधलीं झाडें । जालीं चंदनाचेनि पाडें । वसिष्ठें मानिली कीं भांडें । भानूसीं शाटी ॥ ३२ ॥ मा मी तव चित्तथिला । आणि श्रीगुरु ऐसा दादुला । जो दिठीवेनि आपुला । बैसवी पदीं ॥ ३३ ॥ आधींचि देखणी दिठी । वरी सूर्य पुरवी पाठी । तैं न दिसे ऐसी गोठी । केंही आहे ॥ ३४ ॥ म्हणौनि माझे नित्य नवे । श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे । श्रीगुरुकृपा काय नोहे । ज्ञानदेवो म्हणे ॥ ३५ ॥ याकारणें मियां । श्रीगीतार्थु मऱ्हाठिया । केला लोकां यया । दिठीचा विषो ॥ ३६ ॥ परी मऱ्हाठे बोलरंगें । कवळितां यें गीतांगें । तैं गातयाचेनि पांगें । येकाढतां नोहे ॥ ३७ ॥ म्हणौनि गीता गावों म्हणे । तैं गाणिवें होती लेणें । ना मोकळे तरी उणें । गीताही आणित ॥ ३८ ॥ सुंदर आंगीं लेणें न सूये । तैं तो मोकळा शृंगारु होये । ना लेइलें तरी आहे । तैसें कें उचित ॥ ३९ ॥ कां मोतियांची जैसी जाती । सोनयाही मान देती । नातरी मानविती । अंगेंचि सडीं ॥ १७४० ॥ नाना गुंफिलीं कां मोकळीं । उणीं न होती परिमळीं । वसंतागमींचीं वाटोळीं । मोगरीं जैसीं ॥ ४१ ॥ तैसा गाणिवेतें मिरवी । गीतेवीणही रंगु दावीं । तो लाभाचा प्रबंधु ओंवी । केला मियां ॥ ४२ ॥ तेणें आबालसुबोधें । ओवीयेचेनि प्रबंधें । ब्रह्मरससुस्वादें । अक्षरें गुंथिलीं ॥ ४३ ॥ आतां चंदनाच्या तरुवरीं । परिमळालागीं फुलवरी । पारुखणें जियापरी । लागेना कीं ॥ ४४ ॥ तैसा प्रबंधु हा श्रवणीं । लागतखेंवो समाधि आणी । ऐकिलियाही वाखाणी । काय व्यसन न लवी ॥ ४५ ॥ पाठ करितां व्याजें । पांडित्यें येती वेषजे । तैं अमृतातें नेणिजे । फावलिया ॥ ४६ ॥ तैसेंनि आइतेपणें । कवित्व जालें हें उरेणें । मनन निदिध्यास श्रवणें । जिंतिलें आतां ॥ ४७ ॥ हे स्वानंदभोगाची

सेल । भलतयासीचि देईल । सर्वेंद्रियां पोषवील । श्रवणाकरवीं ।। ४८ ।। चंद्रातें आंगवणें । भोगूनि चकोर शाहाणे । परी फावे जैसें चांदिणें । भलतयाही ।। ४९ ।। तैसें अध्यात्मशास्त्रीं यिये । अंतरंगचि अधिकारिये । परी लोकु वाक्‌चातुर्यें । होईल सुखिया ।। १७५० ।। ऐसें श्रीनिवृत्तिनाथाचें । गौरव आहे जी साचें । ग्रंथु नोहे हें कृपेचें । वैभव तिये ।। ५१ ।। क्षीरसिंधु परिसरीं । शक्तीच्या कर्णकुहरीं । नेणों कैं श्रीत्रिपुरारीं । सांगितलें जें ।। ५२ ।। तें क्षीरकल्लोळाआंतु । मकरोदरीं गुप्तु । होता तयाचा हातु । पैठें जालें ।। ५३ ।। तो मत्स्येंद्र सप्तशृंगी । भग्नावयवा चौरंगी । भेटला कीं तो सर्वांगीं । संपूर्ण जाला ।। ५४ ।। मग समाधि अव्युत्थया । भोगावी वासना यया । ते मुद्रा श्रीगोरक्षराया । दिधली मीनीं ।। ५५ ।। तेणें योगाब्जिनीसरोवरु । विषयविध्वंसैकवीरु । तियें पदीं कां सर्वेश्वरु । अभिषेकिला ।। ५६ ।। मग तिहीं तें शांभव । अद्वयानंदवैभव । संपादिलें सप्रभव । श्रीगहिनीनाथा ।। ५७ ।। तेणें कळिकळितु भूतां । आला देखोनि निरुता । ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दिधली ऐसी ।। ५८ ।। ना आदिगुरु शंकरा- । लागोनि शिष्यपरंपरा । बोधाचा हा संसरा । जाला जो आमुतें ।। ५९ ।। तो हा तूं घेऊनि आघवा । कळीं गिळितयां जिवां । सर्व प्रकारीं धांवा । करीं पां वेगीं ।। १७६० ।। आधींच तंव तो कृपाळू । वरी गुरुआज्ञेचा बोलू । जाला जैसा वर्षाकाळू । खवळणें मेघां ।। ६१ ।। मग आर्तांचेनि वोरसें । गीतार्थग्रंथनमिसें । वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथु ।। ६२ ।। तेथ पुढां मी बापिया । मांडला आर्ती आपुलिया । कीं यासाठीं येवढिया । आणिलों यशा ।। ६३ ।। एवं गुरुक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें । तें ग्रंथें बोधौनि दिधलें । गोसावी मज ।। ६४ ।। वांचूनि पढे ना वाची । ना सेवाही जाणें स्वामीची । ऐशिया मज ग्रंथाची । योग्यता कें असे ।। ६५ ।। परी साचचि गुरुनाथें । निमित्त करूनि मातें । प्रबंधव्याजें जगातें । रक्षिलें जाणा ।। ६६ ।। तऱ्ही पुरोहितगुणें । मी बोललों पुरें उणें । तें तुम्हीं माउलीपणें । उपसाहिजो जी ।। ६७ ।। शब्द कैसा घडिजे । प्रमेयीं कैसें पां चढिजे । अळंकारु म्हणिजे । काय तें नेणें ।। ६८ ।। सायिखडेयाचें बाहुलें । चाळवित्या सूत्राचेनि चाले । तैसा मातें दावीत बोले । स्वामी तो माझा ।। ६९ ।। यालागीं मी गुणदोष- ।

विषीं क्षमाविना विशेष । जे मी संजात ग्रंथलों देख । आचार्यें कीं ।। १७७० ।। आणि तुम्हां संतांचिये सभे । जें उणिवेंसी ठाके उभें । तें पूर्ण नोहे तैं लोभें । तुम्हांसीचि कोपें ।। ७१ ।। सिवतलियाही परिसें । लोहत्वाचिये अवदसे । न मुकिजे आयसें । तैं कवणा बोलु ।। ७२ ।। वोहळें हेंचि करावें । जे गंगेचें आंग ठाकावें । मगही गंगा जरी नोहावें । तैं तो काय करी ।। ७३ ।। म्हणौनि भाग्ययोगें बहुवें । तुम्हां संतांचें मी पाये । पातलों आतां कें लाहे । उणें जगीं ।। ७४ ।। अहो जी माझेनि स्वामी । मज संत जोडुनि तुम्हीं । दिधलेति तेणें सर्वकामीं । परिपूर्ण जालों ।। ७५ ।। पाहा पां मातें तुम्हां सांगडें । माहेर तेणें सुरवाडें । ग्रंथाचें आळियाडें । सिद्धी गेलें ।। ७६ ।। जी कनकाचें निखळ । वोतूं येईल भूमंडळ । चिंतारत्नीं कुळाचळ । निर्मूं येती ।। ७७ ।। सातांही हो सागरातें । सोपें भरितां अमृतें । दुवाड नोहे तारांतें । चंद्र करितां ।। ७८ ।। कल्पतरूचे आराम । लावितां नाहीं विषम । परी गीतार्थाचें वर्म । निवडूं न ये ।। ७९ ।। तो मी येकु सर्व मुका । बोलोनि मऱ्हाठिया भाखा । करी डोळेवरी लोकां । घेवों ये ऐसें जें ।। १७८० ।। हा ग्रंथसागरु येव्हढा । उतरोनि पैलीकडा । कीर्तिविजयाचा धेंडा । नाचे जो कां ।। ८१ ।। गीतार्थाचा आवारु । कलशेंसीं महामेरु । रचूनि माजीं श्रीगुरु- । लिंग जें पूजीं ।। ८२ ।। गीता निष्कपट माय । चुकोनि तान्हें हिंडे जें वाय । तें मायपूता भेटी होय । हा धर्म तुमचा ।। ८३ ।। तुम्हां सज्जनांचें केलें । आकळुनी जी मी बोलें । ज्ञानदेव म्हणे थेंकुलें । तैसें नोहें ।। ८४ ।। काय बहु बोलों सकळां । मेळविलों जन्मफळा । ग्रंथसिद्धीचा सोहळा । दाविला जो हा ।। ८५ ।। मियां जैसजैसिया आशा । केला तुमचा भरंवसा । ते पुरवूनि जी बहुवसा । आणिलों सुखा ।। ८६ ।। मजलागीं ग्रंथाची स्वामी । दुजीं सृष्टी जे हे केली तुम्हीं । तें पाहोनि हांसों आम्हीं । विश्वामित्रातेंही ।। ८७ ।। जे असोनि त्रिशंकुदोषें । धातयाही आणावें वोसें । तें नासतें कीजे कीं ऐसें । निर्मविं नाहीं ।। ८८ ।। शंभू उपमन्यूचेनि मोहें । क्षीरसागरुही केला आहे । येथ तोही उपमे सरी नोहे । जे विषगर्भ कीं ।। ८९ ।। अंधकारु निशाचरां । गिळितां सूर्यें चराचरां । धांवा केला तरी खरा । ताउनी कीं तो ।। १७९० ।। तातलियाही जगाकारणें । चंद्रें वेंचिलें चांदणें । तया सदोषा केवीं म्हणे । सारिखें हें ।। ९१ ।। म्हणौनि

तुम्ही मज संतीं । ग्रंथरूप जो हा त्रिजगतीं । उपयोग केला तो पुढती । निरुपम जी ।। ९२ ।। किंबहुना तुमचें केलें । धर्मकीर्तन हें सिद्धी नेलें । येथ माझें जी उरलें । पाईकपण ।। ९३ ।। आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें । तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ।। ९४ ।। जे खळांची व्यंकटी सांडो । तयां सत्कर्मीं रती वाढो । भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ।। ९५ ।। दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो । जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ।। ९६ ।। वर्षत सकळमंगळीं । ईश्वर निष्ठांची मांदियाळी । अनवरत भूतळीं । भेटतु या भूतां ।। ९७ ।। चला कल्पतरूंचे आरव । चेतना चिंतामणीचें गांव । बोलते जे अर्णव । पीयूषाचे ।। ९८ ।। चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन । ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ।। ९९ ।। किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं । भजिजो आदिपुरुखीं । अखंडित ।। १८०० ।। आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें । दृष्टादृष्टविजयें । होआवें जी ।। १ ।। तेथ म्हणे श्रीविश्वेशरावो । हा होईल दानपसावो । येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया जाला ।। २ ।। ऐसें युगीं परी कळीं । आणि महाराष्ट्रमंडळीं । श्रीगोदावरीच्या कूलीं । दक्षिणलिंगीं ।। ३ ।। त्रिभुवनैक पवित्र । अनादि पंचक्रोश क्षेत्र । जेथ जगाचें जीवनसूत्र । श्रीमहाल्या (श्री महाळसा) असे ।। ४ ।। तेथ यदुवंशविलासु । जो सकळकळानिवासु । न्यायातें पोषी क्षितीशु । श्रीरामचंद्रु ।। ५ ।। तेथ महेशान्वयसंभूतें । श्रीनिवृत्तीनाथसुतें । केलें ज्ञानदेवें गीतें । देशीकार लेणें ।। ६ ।। एवं भारताच्या गांवीं । भीष्मनाम प्रसिद्ध पर्वीं । श्रीकृष्णार्जुनीं बरवी । गोठी जे केली ।। ७ ।। जें उपनिषदांचें सार । सर्व शास्त्रांचें माहेर । परमहंसीं सरोवर । सेविजे जें ।। ८ ।। तिये गीतेचा कलशु । संपूर्ण हा अष्टादशु । म्हणे निवृत्तिदासु । ज्ञानदेवो ।। ९ ।। पुढती पुढती पुढती । इया ग्रंथपुण्यसंपत्ती । सर्वसुखीं सर्वभूतीं । संपूर्ण होईजे ।। १८१० ।। शके बाराशतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें । सच्चिदानंदबाबा आदरें । लेखकु जाहला ।। ११ ।।

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां अष्टादशोऽध्यायः ।। १८ ।। श्लोक ७८, ओव्या १८११.

श्रीएकनाथमहाराजांनी ज्ञानेश्वरी ग्रंथ संशोधन केल्यानंतर ज्ञानेश्वरीसंबंधाने केलेल्या ओव्या.

**श्रीशके पंधराशें साहोत्तरीं । तारणनामसंवत्सरीं । एकाजनार्दनें अत्यादरीं । गीता-ज्ञानेश्वरी प्रतिशुद्ध केली ।। १ ।। ग्रंथ पूर्वीच अतिशुद्ध । परी पाठांतरीं शुद्ध अबद्ध । तो शोधूनियां एवंविध । प्रतिशुद्ध सिद्धज्ञानेश्वरी ।। २ ।। नमो ज्ञानेश्वरा निष्कलंका । जयाची गीतेची वाचितां टीका । ज्ञान होय लोकां । अतिभाविकां ग्रंथार्थियां ।। ३ ।। बहुकाळपर्वणी गोमटी । भाद्रपदमास कपिलाषष्ठी । प्रतिष्ठानीं गोदातटीं । लेखनकामाठी संपूर्ण जाहली ।। ४ ।। ज्ञानेश्वरीपाठीं । जो ओंवी करील मऱ्हाटी । तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेविली ।। ५ ।।**

।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।



# श्रीज्ञानेश्वरीतील कठीण ओव्यांचे अर्थ
## (मंगलाचरणांच्या अर्थासह)

### अध्याय पहिला

ॐ हे पद मंगलवाचक आहे. हे देवा, तू ॐकार स्वरूप आहेस; जगताचे आदिकारण आहेस. देवाचे यथार्थ ज्ञान वेदाकडूनच होते त्यामुळे वेदालाच अगम्य असणाऱ्या देवा, तुला माझा आदरपूर्वक नमस्कार असो. तू स्वयंप्रकाश असून सर्व भूतांमध्ये आत्मरूपाने एकटाच असतोस. तुझा जयजयकार असो ।। १ ।।

देवा ! तूच सर्व विघ्नहर्ता गणेश आहेस. संपूर्ण विश्वाला आणि सर्वांच्या बुद्धीला प्रकाशित करणारा, मूळ प्रकाशही तूच आहेस. श्रीमन्निवृत्तिनाथांचे शिष्य ज्ञानदेव म्हणतात, महाराज तो गणपती कसा आहे असे म्हणाल तर ऐका ।। २ ।।

संपूर्ण वेदवाङ्मय हीच त्या गणपतीची सुंदर वेषभूषा केलेली मूर्ती आहे. दोषरहित स्वरादी विशिष्ट वर्णरचना हेच त्या गणेशाचे शरीरसौंदर्य शोभून दिसत आहे ।। ३ ।।

याशिवाय त्या गणेशाचे स्वरूप असे आहे की, मन्वादिक स्मृती त्या गणपतीच्या शरीराचे अवयव आहेत. निर्दोष शब्दरचनेने व लावण्याने नटलेल्या अर्थशोभेने शरीराचा स्वाभाविक असलेला सुंदरपणा रमणीय दिसत आहे ।। ४ ।।

अठरा पुराणे त्या गणेशाच्या अंगावरील रत्नखचित अलंकार आहेत. त्या पुराणांतील योग्य पदयोजना हीच कोंदणे आहेत व त्यांत सिद्धांत रत्ने बसविली आहेत ।। ५ ।।

लालित्यपूर्ण पदयोजना हेच त्या गणेशाच्या अंगावरील रंगविलेले वस्त्र आहे. साहित्यातील रसालंकारादी प्रकार हेच त्या वस्त्रांतील लकलकीत दिसणारे, भरपूर लांबीरुंदीचे तलम पोत होय ।। ६ ।।

आता आणखी पहा; काव्ये, नाटके यांविषयी कौतुकाने विचार केला असता ती गणपतीच्या करगोटयातील लहान लहान घागऱ्या असून त्यातील अर्थ हा जणू घागऱ्यांचा मंजुळ ध्वनीच रुणझुणत आहे ।। ७ ।।

त्या काव्यनाटकांत प्रतिपादिलेल्या सिद्धांत तत्त्वांचे अनेक प्रकार पदांच्या द्वारा प्रकट झाले आहेत. बारकाईने पाहिले असता पदांच्या कोंदणात प्रमेय रत्ने कौशल्याने

बसविली असल्याचे दिसून येते. उचित पदांच्या कोंदणात सिद्धांत रत्ने ही उठून दिसतात ।। ८ ।।

व्यासादिक मुनींच्या बुद्धी हीच गणपतीच्या कंबरेस बांधलेली मेखळा शोभत आहे आणि बुद्धीच्या निर्दोष सरळवृत्ती ह्या त्या शेल्याच्या लोंबत असलेल्या पदराच्या दशा आहेत आणि त्या निर्मळपणाने झळकत आहेत ।। ९ ।।

आता असे पहा की, न्याय, वैशेषिक, पूर्वमीमांसा, उत्तरमीमांसा, सांख्य, योग ही सहा दर्शने आहेत. ती सहा दर्शने हीच त्या गणपतीचे सहा बाहू आहेत. त्या सहा हातांत एकमेकांत भिन्न भिन्न मते असलेल्याची सूचक अशी भिन्न भिन्न आयुधे आहेत ।। १० ।।

न्यायदर्शनातील तर्क हाच परशू आहे. नीतिभेद हा दुसऱ्या हातातील अंकुश आहे. वेदांत दर्शनातील ब्रह्मरसाने ओथंबलेला सिद्धांत हाच त्या गणपतीच्या एका हातातील महारसाचा गोड मोदक आहे ।। ११ ।।

गणपतीच्या एका हातात जो स्वभावतःच खंडित तुटका दात आहे, तो दात शून्य बौद्धमत स्वभावतःच खंडित असल्याचे सूचित करीत आहे ।। १२ ।।

आता शून्यवादाचे खंडन झाल्यानंतर सांख्यप्रणीत सत्कारवाद हा कमलासारखा वर देणारा हात आहे. गणपतीचा जो अभयहस्त आहे. तो धर्माची प्रतिष्ठा करणारा आणि धर्मसंरक्षकास अभयदान करणारा सिद्ध हस्त आहे ।। १३ ।।

आणखी पहा; सारासार विवेक हाच अत्यंत निर्मळ असा त्या गणेशाच्या सोंडेचा लांबसडक भाग असून त्या सरळ सोंडेच्या ठिकाणी विशुद्ध आणि नित्यनिरतिशय ब्रह्मानंद आहे ।। १४ ।।

प्रेमाने व आदराने होणारा हितकर संवाद हाच त्या गणेशाच्या मुखातील दात असून त्यातील निःपक्षपातीपणा किंवा भूतमात्रांचे ठिकाणी सदयतेने लाभलेली अपार समता, हाच त्या दाताचा पांढरा रंग आहे. ज्ञानदृष्टी हीच त्या गणपतीची सूक्ष्म दृष्टी असून हा श्रीगणेशदेव सर्व विघ्नहर्ता आहे ।। १५ ।।

मला तर असे वाटते की, पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा ह्या त्या गणेशाच्या दोन कानांच्या ठिकाणी असून मननशील मुनी हेच कोणी भ्रमर असून, ते त्या गणपतीच्या गंडस्थळातील ज्ञानरूपी मदामृताचे सेवन करीत आहेत ।। १६ ।।

श्रुती, स्मृती व पुराण यांतील सिद्धांत हीच कोणी त्या गणपतीच्या अंगावरील सतेज पोवळी आहेत. त्या गणपतीच्या मस्तकावर द्वैत आणि अद्वैत ही दोन मते म्हणजे त्याची

गंडस्थळेच आहेत. द्वैताद्वैतरूपी मते ही परस्पर विरोधी असून, तत्त्वसमन्वय विचाराचे बाबतीत तुल्यबलेकरून समान असल्याचे द्योतक म्हणूनच या गणेशाच्या मस्तकावर ही गंडस्थळे सारखेपणाने एकत्र आली आहेत ।। १७ ।।

ईशावास्यादी दहा उपनिषदे ज्ञानरूप मकरंदाने परिपूर्ण आहेत. सखोल अर्थभरीत असून ज्ञानदानाचे बाबतीत उदार आहेत. ती जणू सुगंधी फुले असून त्या गणेशाच्या मुकुटावर सुंदरपणाने शोभत आहेत ।। १८ ।।

ओंकारातील पहिली अकार मात्रा म्हणजेच त्या गणेशाचे दोन पाय आहेत आणि दुसरी उकार मात्रा म्हणजे त्याचे मोठे पोट आहे. तिसरी मात्रा म्हणजे मोठा वाटोळघा मस्तकाचाच आंकार आहे ।। १९ ।।

अकार, उकार, मकार या तिन्ही मात्रा एकत्र झालेल्या ॐकारामध्ये संपूर्ण वेदांचाच समावेश होतो. असे आदिकारणरूप जे ओंकारस्वरूप त्या गणेशदेवास मी श्रीगुरु श्रीमन्निवृत्तिनाथांच्या कृपेने नमस्कार करतो ।। २० ।।

आता नवनवोन्मेषशालिनी प्रतिभासंपन्न अशा अपूर्व वाणीच्या रूपाने विलास क्रीडा करणारी चातुर्य, शास्त्रार्थ निर्णय व चौसष्ट कला यांची स्वामिनी, आपल्या वाङमय चातुर्याने विश्वाला मोहित करणारी जी सरस्वती, तिला मी नमस्कार करतो ।। २१ ।।

तेव्हा आमच्या या समर्थ सैन्याबरोबर कोण लढू शकेल ? पांडवांचे सैन्य पहावे तर ते अगदीच थोडे आहे ; परंतु त्याची वरपांग रचना मात्र मोठी दिसते ।। ११९ ।।

ज्याप्रमाणे आपल्या घराला एकाएकी, सहज, चुकून अग्नी लागला तर तो भडकलेला अग्नी शेजारची दुसरीही घरे जाळून टाकतो ।। २५८ ।।

## अध्याय दुसरा

नाजुक अशा हृदयाच्या मर्मस्थानी, कारुण्याची पूर्ण भरतीची वेळ आहे. अशी संधी साधून त्या महामोहरूपी काळसर्पाने त्याला दंश केला. (सर्प हा शरीराच्या नाजुक भागी ऐन भर तिन्हीसांजेच्या वेळी चावला तर सर्पाचे विष उतरणे कठीण असते) त्यामुळे त्या लहरी उतरतच नव्हत्या ।। ७१ ।।

तुम्ही, आम्ही व हे भूपती नित्य आहोत. तसेच राहू किंवा कायमचे नाश पावू, या दोन्ही गोष्टी भ्रममूलक आहेत. तो भ्रम जर नाहीसा झाला तर यांपैकी एकही खरे नाही असे कळून येईल ।। १०४ ।।

तुझ्या गुणांवर लुब्ध होऊन, प्रेमभराने तुजवर अतिशय आसक्त झाल्यामुळे, ही कीर्तीरूपी स्त्री उत्कट इच्छेने तुला स्वयंवरामध्ये माळ घालून वरण्यास आलेली आहे ।। १९३ ।।

आता हे समोर असलेले धर्मयुद्धाचे कर्तव्य टाळावयाचे आणि जो विषय आता तुझ्यासमोर नाही त्या भलत्या विषयाबद्दल शोक करीत बसणे हे आपली आपण हानी करून घेण्यासारखे आहे ।। १९६ ।।

असा त्या तुझ्या कीर्तीचा महिमा गंगेच्या पाण्याप्रमाणे निर्मळ व गहन आहे. आणि तो पाहून व ऐकून, जगातील मोठमोठ्या योद्ध्यांना कीर्ती संपादन करण्याचा तो एक मार्ग झाला आहे ।। २१३ ।।

आता आणखी काही ज्ञान मिळवावे किंवा पूर्वी मिळविलेले ज्ञान ते पुन: आठवावे, हे सर्व अर्जुना ! सहजच थांबेल ।। २८२ ।।

## अध्याय चौथा

आज खरोखरी अज्ञानमय अंधकारात वावरणाऱ्या श्रवणेंद्रियांना भाग्योदयरूपी एक आगळा दिवसच उजाडला आहे. कारण, श्रवणेंद्रियाने आज गीतारूपी संपत्तीचा ठेवाच पाहिला आहे. तत्त्वत: श्रवणेंद्रियाला गीतानिधान दिसणे हे एक स्वप्नच आहे पण ते आज मात्र खऱ्याच्या तुलनेस उतरले आहे ।। १ ।।

अगोदरच ही आत्मानात्म विवेकाची गाथा, त्यात श्रेष्ठ श्रीकृष्ण तिचे प्रतिपादन करणारे वक्ते आहेत आणि भक्त शिरोमणी अर्जुन हा श्रोता ऐकत आहे ।। २ ।।

पंचमस्वरांतील उत्तम आलापयुक्त गायन असावे ; सुगंध, तसेच सुमधुर, रुचकर पक्वान्न असावे; हे सर्व एके ठिकाणी आल्यानंतर जसा नितांत आनंद लाभतो, त्याप्रमाणे आत्मानात्म विवेक हा प्रतिपाद्य विषय, प्रतिपादक श्रीकृष्ण परमात्मा आणि श्रोता भक्तराज अर्जुन या त्रिवेणी संगमामुळे गीताकथा प्रसंग अतिशय मनोहर झाला आहे ।। ३ ।।

आज श्रोत्यांच्या भाग्याची काय थोरवी वर्णावी ! ज्यामुळे अमृत गंगाच त्यांना लाभली किंवा या रूपाने श्रोत्यांची पूर्वीच्या अनंत जन्मांतील जपतपेच फळास आली आहेत ।। ४ ।।

आता सर्व इंद्रियांनी आपापल्या विषयांचा परित्याग करून, एका श्रवणेंद्रियाच्याच घरी प्रवेश करावा. मग त्या सर्वांनी श्रीकृष्णार्जुन संवादाचे गीतानामक एक आगळे सुख उपभोगावे ।। ५ ।।

तेव्हा संत सज्जन श्रोते म्हणाले, ज्ञानदेवा ! तू हा अप्रासंगिक पाल्हाळ आता पुरे कर. श्रीकृष्ण आणि अर्जुन हे दोघे काय बोलत होते ती कथाच आम्हास सांग ।। ६ ।।

त्यावेळी ज्ञानदेव कथेस सुरुवात करतात—संजय धृतराष्ट्रास म्हणाला, दैवी संपत्तीने वा दैवसंज्ञक गुणांनी आज अर्जुनाचाच आश्रय केला आहे. कारण, साक्षात श्रीकृष्णच अर्जुनाशी अतिप्रेमाने बोलत आहेत ।। ७ ।।

जे गुह्य आपला पिता वसुदेव याला त्याने कधीच सांगितले नाही, जे माता देवकीला सांगितले नाही, जे बंधु बळिरामासही सांगितले नाही, ते गुह्य-ज्ञान आज अर्जुनास तो सांगत आहे ।। ८ ।।

देवी लक्ष्मी एवढी जवळ असणारी खरी; पण तिलाही या संवादप्रेमाचे सुख कधीही अनुभवावयास मिळाले नाही. आज श्रीकृष्ण प्रेमसुखाचे पीक या अर्जुनालाच मिळत आहे ।। ९ ।।

आपल्याला श्रीकृष्ण प्रेमसुख लाभावे आणि त्यामुळे भगवंतासी सुखसंवाद करता यावा अशा सनकादिकांच्याही आशा, खरोखर बहुत दिवसांपासून वाढल्या होत्या; पण त्याही अर्जुनाच्या इतक्या यशास आल्याच नाहीत ।। १० ।।

या जगदीश्वराचे प्रेम या एका अर्जुनाचे ठिकाणीं मात्र अनुपमेय स्वरूपाचे दिसत आहे. या अर्जुनाने किती सर्वोत्कृष्ट पुण्य केले असावे बरे ! कळत नाही ! ! ।। ११ ।।

असे पहा की, अर्जुनाच्या प्रेमाकरिताच हा निराकार देव, साकार झाला आहे आणि तो अर्जुनाच्याच एकमेव कल्याणासाठी अवतीर्ण झाला आहे, असे मजला वाटत आहे ।। १२ ।।

एरवी हा भगवान योग्यांनाही सापडत नाही, वेदार्थासही आकलन होत नाही व ज्याच्यापर्यंत ध्यानाचीही दृष्टी पोचत नाही ।। १३ ।।

तो मूळात आत्मस्वरूप, उत्पत्तिरहितस्वरूप, क्रियारहितस्वरूप, अचलस्वरूप असा असूनही, अर्जुनासाठी किती करुणावंत झाला आहे पहा ! ! ।। १४ ।।

हा श्रीकृष्णच त्रैलोक्यरूप वस्त्राची घडी आहे. आकारांच्या पलीकडील काठ आहे; पण या अर्जुनाच्या प्रेमाच्या कसा स्वाधीन झाला आहे, हे कळत नाही ! ।। १५ ।।

कर्माशिवाय इतर कोणी फळ देणारे व घेणारे नाहीत. म्हणून मानव जन्मात केवळ कर्मच फलप्राप्ती करून देणारे आहे ।। ७३ ।।

जे रात्रंदिवस ज्ञानयज्ञ करणारे आहेत, ज्यांनी गुरुवाक्यरूप अग्नीत मनासहवर्तमान अविद्येचे हवन केले आहे ।। १२३ ।।

अर्जुना ! जे (यज्ञद्वारा) आत्मसुखाची इच्छा करतात. योगरूप अग्नीने साग्निक असलेल्या अग्निहोत्री पुरुषांनी जो होम केलेला असतो त्यासच 'दैवयज्ञ' असे म्हणतात ॥ १२४ ॥

आता जे ब्रह्माग्नीचे अग्निहोत्री आहेत (ब्रह्मप्राप्तीची इच्छा करणारे) ते स्वधर्म यज्ञानेच यज्ञपुरुषांची उपासना करतात. त्याजविषयी वर्णन सांगतो ते ऐक ॥ १२५ ॥

एक श्रोत्रादी इंद्रियांचे संयमरूपी अग्नीत हवन करतात. आणि इतर इंद्रियाग्नी पेटवून त्यांत शब्दादी विषयांचे हवन करतात. (संयम म्हणजे धारणा, ध्यान, समाधी यांचे एकत्रीकरण.) (इंद्रियांचे हवन म्हणजे पूर्ण इंद्रियनिग्रह) ॥ १२६ ॥

दुसरे कोणी वैराग्यरूपी सूर्य उगवल्यावर, संयमरूपी कुंडाची रचना करून त्या कुंडामध्ये इंद्रियरूपी अग्नी पेटवून तो प्रज्वलित करतात ॥ १२७ ॥

त्या इंद्रियाग्नीने वैराग्यरूप ज्वाला घेतली तेव्हा लागलीच कामक्रोधादी विकार-रूप लाकडे पेटली. पंचज्ञानेंद्रियरूपी पाच कुंडांतून विषय आशारूपी धूर निघून जातो. (इंद्रियांचे ठिकाणी विषयाची आशा नाहीशा करतात) ॥ १२८ ॥

मग वेदांत सांगितलेल्या विधिवाक्याच्या कुशलतेच्या साह्याने इंद्रियरूप अग्नी असलेल्या कुंडांत विषयरूपी आहुती देऊन यज्ञ करतात ॥ १२९ ॥

याप्रमाणे हृदयरूप अरणीवर विचाररूप मंथा करून आपल्या सर्व दोषांचे क्षालन केले ॥ १३० ॥

तो (मंथा) धैर्यरूप भाराने वरून दाबून धरला. आणि शांतिरूप रज्जूने वळकट बांधला व गुरुवाक्यरूप मंत्राच्या साह्याने जोराने घुसळला ॥ १३१ ॥

अशा रीतीने समरस होऊन मंथन केले त्यामुळे ते तात्काळ उपयोगास आले. ज्ञानाग्नी प्रकट झाला ॥ १३२ ॥

त्यातून उत्पन्न होणारा ऋद्धिसिद्धीचा धूर नाहीसा झाल्यावर सूक्ष्म अग्निस्फुल्लिंग प्रकट होतो ॥ १३३ ॥

त्या अग्नीत यमनियमांच्या योगाने हलक्या झालेल्या मनाच्या समिधा त्यात घातल्या ॥ १३४ ॥

ज्वाळा उत्पन्न झाल्यावर त्यात इतर सर्व वासना जाळून टाकतात. त्यावर आसक्तीचे स्नेह ओतून त्याचे हवन करतात ॥ १३५ ॥

नंतर यज्ञ करणाऱ्या जीवरूप दीक्षिताने 'सोऽहं' या मंत्राने त्या प्रदीप्त केलेल्या ज्ञानरूपी अग्नीत इंद्रियकर्माची आहुती दिली ॥ १३६ ॥

शेवटी प्राणक्रियारूपी स्रुवा नावाच्या यज्ञपात्रासह ज्ञानाग्नीमध्ये पूर्णाहुती दिली. म्हणून ब्रह्मात्मैक्य बोधरूपी शेवटचे अवभृतस्नान सहजच घडले ।। १३७ ।।

मग संयमाग्नीमध्ये इंद्रियादिक होमद्रव्यांचे हवन करून बाकी उर्वरित राहिलेले जे आत्मज्ञानाचे सुख, तेच पुरोडांश म्हणून त्यांनी घेतले ।। १३८ ।।

कोणी अशा रीतीने या यज्ञांनी त्रिभुवनात मुक्त झाले. म्हणून ह्या यज्ञक्रिया जरी भिन्न भिन्न प्रकारच्या आहेत तरी त्या सर्वांची अखेर फलप्राप्ती एकच आहे ।। १३९ ।।

हे जे यज्ञ सांगितले त्यांपैकी एकाला 'द्रव्ययज्ञ' असे म्हणतात. एकाला म्हणजे तपरूप सामग्रीने साध्य केलेल्या (यज्ञाला) 'तपोयज्ञ' म्हणतात. एकाला (अष्टांग साधनाने साधलेल्या यज्ञाला) 'योगयज्ञ' असे म्हणतात ।। १४० ।।

तसेच कोणी अपानवायू, प्राणवायूच्या ठिकाणी समर्पित करतात. आणि कोणी तर प्राण व अपान या दोनही वायूंचा निरोध करतात. त्यांना अर्जुना ! 'प्राणायामी' (यज्ञ करणारे) असे म्हणतात ।। १४५ ।।

कोणी हटयोगाच्या क्रमाने सर्व आहार जिंकून प्राणवायुरूपी अग्नीत प्रयत्नपूर्वक त्वरेने प्राणाचे हवन करतात ।। १४६ ।।

अशा प्रकारे हे सांगितलेले सर्व यज्ञकर्ते मोक्षप्राप्तीचीच इच्छा करणारे आहेत. त्यांनी त्या यज्ञांच्या द्वारे आपले कामक्रोधादिक विकाराचे मनोमळ धुऊन नाहीतसे केलेले असतात ।। १४७ ।।

अशा प्रकारे (आत्मविषयक) सर्व अविद्या—अज्ञान जाळून टाकल्यामुळे जे स्वाभाविकपणेच आपले शुद्ध स्वरूप शिल्लक राहते व जेथे अग्नी आणि यज्ञ करणारा असा द्वैतभाव शिल्लक राहतच नाही ।। १४८ ।।

ज्या ठिकाणी यज्ञ करणारांच्या सर्व इच्छा पूर्ण होतात व यज्ञक्रिया संपतात. सर्व क्रिया मागच्या पावली परतून नाहीशा होतात ।। १४९ ।।

ज्या ठिकाणी विचाराचा शिरकाव होत नाही, जेथे कामनेचा स्पर्शही होत नाही व जे द्वैत, दोषाच्या संपर्काने लिप्त होत नाही ।। १५० ।।

असे जे अनादी सिद्ध व शुद्ध आणि ज्ञानयज्ञात उर्वरित राहिलेले जे ब्रह्म ते ज्ञानस्वरूप आहे. हे ब्रह्मनिष्ठ पुरुष मी ब्रह्म आहे या मंत्राने ब्रह्मरूप होतात ।। १५१ ।।

ज्या ठिकाणी प्रवृत्ती पांगळी होते, तर्काची दृष्टी नाहीशी होते व इंद्रिये आपापला विषयाचा भोग विसरतात ।। १६१ ।।

ज्या ज्ञानाच्या प्रकाशामुळे अमूर्त परमात्म्याची पडछाया असलेला जगदाभास उरतच नाही, तेथे मनाचे मळ (मल-विक्षेप-आवरणादी) कोठून राहतील ? वास्तविक असे बोलणेच अतीव अनुचित आहे. कारण, ह्या जगात ज्ञानाच्या तोडीची समर्थ (अविद्यादी दोष निवृत्त करणारी) अशी दुसरी वस्तूच नाही ।। १७४ ।।

## अध्याय पाचवा

जेव्हा तो भ्रांतिरूप अंथरुणावर निजला होता, तेव्हा स्वप्नसुखाने भुलला होता. परंतु आता ब्रह्मात्मैक्य ज्ञानाचा उदय झाल्यावर तो जागा झाला म्हणून तो कर्ता राहत नाही ।। ४७ ।।

पंचकोश विचाराने त्याहून आत्मा भिन्न आहे असा बुद्धीचा निश्चय झाल्याने आत्म्याचे अपरोक्ष स्वरूपज्ञान व्यक्त होते. तो आपला आत्मा स्वरूपत: ब्रह्मस्वरूप आहे असे ऐक्य भावनेने चिंतन करतो व पूर्णब्रह्माकार वृत्ती स्थिर ठेवून राहतो. रात्रंदिवस ब्रह्मात्मैक्य ज्ञानानुसंधान तत्पर होऊनच राहतो ।। ८७ ।।

तर वैराग्याच्या साह्याने अंतरातील विषयांना बाहेर घालवून, ज्यांनी शरीरा-मध्येच आपले मन एकाग्र केले आहे ।। १५१ ।।

आणि त्यांनीच आपल्या स्वत:ला शुद्ध म्हणजे उपाधिरहित करून प्रपंच अजमावला (मिथ्यात्व निश्चय केला) व मग ते स्वत: त्रिकालाबाधित सत्य अशा ब्रह्माचे स्वरूपच होऊन राहिले ।। १६० ।।

## अध्याय सहावा

यानंतर संजय धृतराष्ट्रास म्हणाला, राजा ! भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला जो अष्टांगयोग स्वरूपाबद्दल आपला अभिप्राय सांगणार आहेत, तोच आता ऐक ।। १ ।।

श्रीनारायणांनी अर्जुनासाठी ब्रह्मरसाच्या भोजनाचा सहजच प्रसंग निर्माण केला होता; त्याचसमयी आम्ही अचानक पाहुणे म्हणून प्राप्त झालो आहोत ।। २ ।।

पहा, भाग्याची थोरवी कशी आहे हे कळत नाही. तहान लागलेल्या मनुष्याने पाणी पिण्याकरिता म्हणून पाण्याचे भांडे तोंडास लावावे व ते चाखून पाहतो तोच ते खास अमृतच आहे, असे त्यास कळावे ।। ३ ।।

त्याचप्रमाणे आमची व तुमची स्थिती झाली आहे. कारण, एखादी आडगिऱ्हाइकी मौल्यवान वस्तू थोडक्यात प्राप्त होते, त्याप्रमाणे आपणांस परब्रह्म तत्त्व सहजच प्राप्त झाले आहे. असे संजयाने म्हटले तोच धृतराष्ट्र संजयास म्हणाला, तुला आम्ही

या ब्रह्मरसाविषयी काहीच विचारीत नाही. मग तू विचारल्याविना उगीच हे काय भलतेच बोलतोस ? ॥ ४ ॥

या बोलण्याने धृतराष्ट्राचे मन कोणत्या स्वरूपाचे आहे हे कळून आले. ते म्हणजे ब्रह्मरससेवनाचे प्रसंगीही त्याचे मन आपल्या पुत्रांची हकीकत ऐकण्याविषयी अतीव उत्कंठित झालेले होते ॥ ५ ॥

हे जाणून संजय मनात विस्मयाने हसला आणि आपल्याशीच म्हणाला, हा म्हातारा पुत्रमोहाने अगदी वेडावला आहे. वाया गेला आहे. एरवी येथपर्यंतचा श्रीकृष्णार्जुनाचा संवाद अती उत्तम झाला आहे ॥ ६ ॥

या कर्ममार्गाने जावयास लागले म्हणजे प्रथम या पर्वताचा यमनियमरूपी तळ लागतो. नंतर आसनाच्या पाऊल वाटेवर येतो व मग प्राणायामरूपी कडचाने योगरूपी डोंगरावर येऊ लागतो ॥ ५५ ॥

नंतर प्रत्याहार हाच कोणी एक अर्धा तुटलेला कडा लागतो. त्याच्यावरून बुद्धीचेही पाय निसटतात. आणि जेथे (तो तुटलेल्या कडयाचा मार्ग ओलांडताना कडेलोट होईल म्हणून हटयोग्यांनासुद्धा) आपल्या प्रतिज्ञा शेवटी सोडून द्याव्या लागतात ॥ ५६ ॥

तरीपण अभ्यासाच्या वळाने प्रत्याहाररूपी चढण्यास कठीण, आधार न देणाऱ्या मार्गात फक्त वैराग्यच हळूहळू पाय रोवून चढू शकते ॥ ५७ ॥

अशा रीतीने (प्राण व अपान) वायुरूप घोडयाच्या पाठीवर बसून मार्ग आक्रमित असता धारणेच्या प्रशस्त रस्त्याने ध्यानरूपी शिखर स्वाधीन होईपर्यंत मार्गक्रमण करतो ॥ ५८ ॥

मग ह्या ठिकाणी धारणा मार्गाची धाव व प्रवृत्तीची हाव खुंटते आणि ज्या अवस्थेत ब्रह्मात्मैक्य झाल्यामुळे साध्यसाधन एकरूप होतात ॥ ५९ ॥

आणि ज्या ठिकाणी पुढील पाऊल टाकणे बंद होऊन मागील कशाचीही आठवण राहत नाही अशा समान ऐक्यरूप भूमिकेवर असलेल्या समाधीत तो पुरुष राहतो ॥ ६० ॥

श्रीज्ञानेशांचे बोलणे म्हणजे ज्ञानरूपी चंद्राचे कसे अगदी स्वच्छ टपोर पडलेले चांदणे आहे. आणि त्यातील भावार्थ हाच त्या चांदण्याचा आल्हाददायक गारवा आहे. गीता-श्लोकाचा अर्थ चंद्रविकासी कमलें असून ती सहजच विकसित होत आहेत ॥ १३४ ॥

ज्यात प्रवृत्तिरूपी वृक्षाखाली कोटचवधी निवृत्तिरूप फळे दृष्टीस पडतात. (ज्यांचे आचरण पूर्ण झालें असता मोक्षप्राप्ती सहजच होते.) त्या या मार्गाचे श्रीशंकर अद्यापपावेतो यात्रेकरू आहेत ॥ १५३ ॥

आता आसनावर स्थिर झाल्यानंतर आपले अंगच अंगास सावरते. प्राणवायूच त्या प्राणवायूस आवरून धरीत असतो. अशा रीतीने अनुभवाचा स्पष्ट उदय होऊ लागतो ॥ १९० ॥

त्या ठिकाणी प्रवृत्ती माघारी फिरते. समाधी अलीकडील तीराला येते. म्हणजे सहज साध्य होते. मग आसनावर वसता क्षणीच सर्व अभ्यास आपोआप पूर्ण होतात ॥ १९१ ॥

मुद्रेची थोरवी आता सांगतो. ती आता ऐक. पोटऱ्या मांडयांस लावून आसन घालावे ॥ १९२ ॥

एका पायावर दुसरा पाय वाकडा ठेवून दोन्ही तळपाय वाकडे करून ते आधार चक्राच्या (गुदस्थानावरील शिवणीवर) बुडाशी चांगले सुस्थिर राहतील असे वळकट वसवावेत ॥ १९३ ॥

अशा रीतीने दृष्टी आतल्या आतच राहते. जर कौतुकाने बाहेर आलीच तर ती नेमकी नाकाच्या शेंडयावर पडते ॥ २०४ ॥

अशी आतल्या आतच दृष्टी कायम राहते. ती पुन: बाहेर येत नाही; असे अर्धोन्मीलित दृष्टीचे नाकाच्या शेंडयावरच राहणे होते ॥ २०५ ॥

आता इतर दिशांकडे पहावे किंवा दुसरी रूपे पहावीत अशा इतर अपेक्षा आपोआप नाहीशा होतात ॥ २०६ ॥

मग गळयाची नळी संकुचित पावते आणि हनुवटी गळयाखालच्या खळगीत अडकून वसते. वक्षस्थळाच्या वरच्या बाजूला दृढ होऊन, दाबून, रोवून राहते ॥ २०७ ॥

हे पंडुकुमरा ! नंतर कंठमणी दिसेनासा होतो. असा जो बंध पडतो त्यास ‘ जालंधरबंध ’ म्हणतात ॥ २०८ ॥

बेंबीवर पुष्ट होतो, पोट खपाटीला जाते व हृदयकमल अंतर्यामी प्रफुल्लित होते ॥ २०९ ॥

अर्जुना ! स्वाधिष्ठान चक्राच्या वरच्या भागावर आणि बेंबीच्या खालच्या भागामध्ये जो बंध पडतो त्यास ‘ ओढियाणबंध ’ म्हणतात ॥ २१० ॥

याप्रमाणे ती कुंडलिनी आपले वेढे सोडून, कौतुकाने अंगातील आळस झाडून नाभिस्कंधापर्यंत उभी राहिलेली दिसते ॥ २२७ ॥

सहजच फारा दिवसांची ती भुकेलेली असते. तशात तिला जागे केल्याचे निमित्त होते. मग ती आवेशाने आपले तोंड सरळ वरती उघडते ॥ २२८ ॥

अर्जुना ! तेव्हा हृदय-कमळाच्या खाली जो वारा भरलेला असतो त्या सगळ्याला ती एकदम खाऊन टाकते ॥ २२९ ॥

आणि मुखातील ज्वाळांनी व्यापून खालचे वरचे मांसादिकांचे घास करून खाऊ लागते ॥ २३० ॥

एरवी प्राण व अपान या दोहोंचा तेव्हाच एकत्र मिलाफ झाला असता ; परंतु ती कुंडलिनी क्षणभर बावरी होऊन 'तुम्ही कोण ? तुम्ही माघारे जा.' असे त्यांना म्हणते ॥ २३८ ॥

सुवर्ण वृक्षास पालवी फुटून रत्नाच्या कळ्या नित्यनव्या याव्यात त्याप्रमाणे (त्याच्या तेजस्वी शरीराला) नवी नखे निघून ती सतेज दिसतात ॥ २६२ ॥

दातही दुसरे येतात; परंतु ते अतिशय बारीक असतात. जणू काय दोन्ही बाजूंना हिऱ्यांच्या दोन पंक्तीच मांडल्या आहेत असे दिसते ॥ २६३ ॥

सर्व अंगावरील रोमांची अग्रे अणुएवढ्या माणकांच्या कणिकांप्रमाणे लहान अशी सतेज सहजच उद्भवतात ॥ २६४ ॥

हातापायांचे तळवे रक्तकमळांप्रमाणे लाल असतात. आणि डोळे अत्यंत स्वच्छ होतात. हे काय सांगावे ! ॥ २६५ ॥

शिंपलीमध्ये मोती परिपक्व दशेला येऊन फुगल्याकारणाने त्या शिंपीत मावत नाहीत. म्हणून शिंपीच्या दोन शकलांचा सांधा उकलतो ॥ २६६ ॥

त्याप्रमाणे दृष्टी पापण्यांच्या कवळीत न मावता त्या कवळीस व्यापून पापण्यांबाहेर येऊ पाहते. ती दृष्टी पहिलीच असते खरी, परंतु सगळ्या आकाशाला व्यापणारी होते ॥ २६७ ॥

अर्जुना, ऐक! देह सुवर्णासारख्या कांतीचा होतो. परंतु त्यास सर्वतोपरी वायूसारखा हलकेपणा येतो. कारण त्यातील जल आणि पृथ्वी यांचा अंशही उरलेला नसतो ॥ २६८ ॥

ती निराकार परमात्म्याची साकार मूर्ती, परब्रह्मरूपी शिवाची संबळी जी ॐकाराची केवळ जन्मभूमीच ॥ २७३ ॥

हे असो, ती कुंडलिनीबाळी हृदयाकाशात आली म्हणजे अखंड अनुहत ध्वनीची बोली बोलू लागते ।। २७४ ।।

त्या कुंडलिनीच्या जवळ बुद्धीचे ज्ञान असल्यामुळे तो अनुहत ध्वनिरूप शब्द किंचितसा ऐकतो ।। २७५ ।।

अर्जुना, ऐक ! कमळातील पोकळीच्या आकाराप्रमाणे हृदयाकाशात जी पोकळ जागा असते ते जणू दुसरे महाकाशच आहे. तेथे चैतन्य हे अधांतरी वास करते ।। २८० ।।

त्या चैतन्याला हृदयाकाशाच्या घरी असलेली कुंडलिनी परमेश्वरी देवी, ही आपल्या तेजाचीच शिदोरी अर्पण करते ।। २८१ ।।

द्वैत ज्यास पहाणार नाही असा बुद्धिरूप, भाजीसह हातात वाढून घेतलेला चांगला नैवेद्य अर्पण केला ।। २८२ ।।

आपली तेजरूप कांती अर्पण केल्यानंतर कुंडलिनी केवळ वायुरूप होऊन राहते. त्यावेळी ती कशी भासते म्हणून म्हणाल तर ।। २८३ ।।

भिवयांच्या आतल्या वाजूस मकाराचेच स्वरूप राहत नाही. तसेच एकटच्या प्राणवायूलादेखील ब्रह्माकाशात येण्याला संकट पडते ।। ३१३ ।।

पुढे तो वायू तेथेच गेल्यावर तदाकार होतो. त्यावेळी बोलणे खुंटते. मग आकाश तत्त्वाचीही आटणी होते ।। ३१४ ।।

आता ज्या अत्यंत निर्विशेष ब्रह्मस्थितीच्या डोहात महदाकाशाचाच थांगपत्ता लागत नाही तेथे या आकाश गुण शब्दाची दाद तरी कशी लागणार ? ।। ३१५ ।।

याप्रमाणे शब्द मात्र जेथून माघारी परततो, जेथे संकल्पाचेही आयुष्य संपते आणि म्हणून तेथे विचाराचा वाराही शिरत नाही ।। ३१९ ।।

याप्रमाणे वाहेरील इंद्रियाची स्थिती नियमित ठेविली तर अंतर्यामी सुखही वाढत जाते. त्या मनुष्याला अभ्यास न करता योग सहजच घडतो. याचा अभिप्राय नियमितपणाने वागणे हे एक अभ्यासाचे अवश्य साधन आहे ।। ३५३ ।।

ज्याप्रमाणे भाग्योदयाच्या उत्कर्षतेने व उद्योगाच्या नुसत्या निमित्ताने सर्व संपत्ती आपोआप घरी चालून येते ।। ३५४ ।।

म्हणून अर्जुना ! ज्या दैववान पुरुषाला युक्तीचे साह्य असते तो मोक्षाच्या राज्याने शोभिवंत होतो ।। ३५६ ।।

आत्मस्वरूपाला पाहून (ते मन) स्वतः तद्रूपही होईल. मग अद्वैत स्वरूपामध्ये द्वैत पार बुडून जाईल आणि हे त्रैलोक्य ऐक्याच्या तेजाने प्रकाशित होईल ।। ३८४ ।।

आकाशात राहून वेगळी दिसणारी अभ्रे ज्या वेळेस नाहीशी होतात तेव्हा संपूर्ण विश्वात एक शुद्ध आकाशच व्याप्त असल्याचे दिसते ।। ३८५ ।।

योगभ्रष्ट पुरुष म्हणजे, जगाला उत्पन्न करणारी जी रंभा म्हणजे पार्वती, तिचा गौरव करणारा योगपीठीचा शंकरच की काय? किंवा वैराग्यसिद्धीचा मूर्तिमंत अनुभवच प्रकट झाला आहे की काय ! ।। ४६२ ।।

किंवा हे संसार मोजण्याचे माप आहे. अथवा अष्टांगयोग साहित्याचे बेटच होय. सुगंधानेच ज्याप्रमाणे चंदनाचे रूप धारण करावे ।। ४६३ ।।

**अध्याय सातवा**

खरोखर उत्पत्तीच्या वेळी ते तत्त्व आकाशाच्या अंकुराने विस्तार पावते आणि अंतकाळी ॐकाराच्या पीठावरील अक्षरेही गिळून टाकते ।। ४० ।।

ती मायानदी निर्गुणरूपी पर्वताच्या तुटलेल्या कड्यांतून मूळ संकल्परूप उसळीने उगम होऊन लागलीच तिच्यात पंचमहाभूतांचा लहानसा बुडबुडा आला ।। ६९ ।।

ती मायानदी सृष्टीच्या विस्ताररूपी ओघाने व कालगतीच्या वेगाने वाढून कर्ममार्ग व मोक्षमार्ग यांचे उंच काठ ओलांडून वाहते ।। ७० ।।

सत्त्वगुणरूपी मेघांची जोरदार वृष्टी झाल्यामुळे भ्रांतिरूप महापुराने भरून ती यमनियमरूपी शहरे वाहून नेते ।। ७१ ।।

द्वेषरूपी भोवऱ्याने गच्च भरली असून मत्सररूप वळणे तिला पडली आहेत. तिच्यात अनवधानता इत्यादी मोठाले मासे तळपत आहेत ।। ७२ ।।

तिच्यात प्रपंचरूपी बेटांची वळणे असून कर्माकर्माचा पूर येतो व तिच्यावर दु:खरूपी केरकचरा–पुराड तरंगत आहे ।। ७३ ।।

तिच्यामधील रतीच्या बेटावर कामरूपी लाटा आदळतात व त्या ठिकाणी जीव-समुदायरूपी पुष्कळ फेस एकत्र झालेला दिसत आहे ।। ७४ ।।

अहंकाररूपी ओघ आहे व त्यावर विद्या, धन आणि सामर्थ्य या तीन मदांच्या चिळकांड्या येतात व विषयरूपी तरंगांच्या लाटाही उसळत आहेत ।। ७५ ।।

तिच्यात उदय आणि अस्तरूपी लोंढे हे मरणाचे धोंडे पडून तेथे पंचभूतात्मक शरीररूप बुडबुडे उत्पन्न होतात व लयास जातात ।। ७६ ।।

तिच्यात अविवेक व भ्रांती हेच कोणी मासे आहेत. ते सात्त्विक धैर्यरूपी आमिष गिळून टाकतात. त्या नदीत अज्ञानरूपी भोवरे वक्रगतीने फिरतात ।। ७७ ।।

जे भ्रांतिरूप गढूळ पाण्याने आशारूप गाळात रुतले व रजोगुणाच्या खळाळाने स्वर्ग गर्जना होत असते ।। ७८ ।।

तिच्यात तमोगुणरूपी मोठी धार असते व सत्त्वगुणरूपी स्थिर पाण्याचा सखोल डोह असतो. फार काय सांगावे ! ही मायानदी तरून जाण्यास अतीव अवघड आहे ।। ७९ ।।

हिच्यामधील पुनर्जन्मरूपी पुराचा लोंढा सत्यलोकाचे बुरुजावर आदळतो, आणि त्या आघातामुळे ब्रह्मांडरूपी धोंडे तेव्हाच गडबडून पडतात ।। ८० ।।

त्या पाण्याच्या वेगाने आजवर वहात आलेला पूर ओसरत नाही. अरे ! असा हा मायापूर कोण तरून जाईल ।। ८१ ।।

आणखी येथे एक मोठेच नवल आहे ! ते हे की, या नदीतून तरून जाण्याला जे जे म्हणून उपाय करावेत ते ते अपायच होतात. ते कसे ते ऐक ।। ८२ ।।

कोणी स्वतःच्याच बुद्धिरूपी बाहुबळावर हिच्यामधून तरून जावे म्हणून हिच्यात उडी टाकतात. पण ते कोणीकडे गेले, त्याचा तर पत्ताच नाही. दुसरे कोणी ज्ञानरूपी डोहात, गर्वानेच पार गिळून टाकले गेले ।। ८३ ।।

कित्येकांनी वेदत्रयाच्या सांगडीचा आश्रय केला. पण त्यावर मीपणाचे धोंडे बांधून घेऊन तरून जाण्यास निघाले. ते मदरूपी माशाच्या तोंडात सबंधच गेले ।। ८४ ।।

कोणी तारुण्याच्या बळरूपी कासपेटा कमरेस कसून मदनाच्या कासेला लागले. तो त्यांना विषयरूप मगरीनेच चघळून टाकले ।। ८५ ।।

मग ते वार्धक्यरूप लाटांमध्ये तरंगत जात असता मतिभ्रंशरूप जाळ्यात सापडतात, त्यायोगे चहूकडून जखडले जातात ।। ८६ ।।

आणि शोकरूप कड्यावर आपटले जातात. पुढे क्रोधरूपी भोवऱ्यात गुरफटले असता त्यातून कोठे वर डोके काढतात तोच की, आपत्तिरूप गिधाडे त्यास टोचटोचून खाऊ लागतात ।। ८७ ।।

मग ते दुःखरूप चिखलाने माखले जातात व मग मरणाच्या वाळूत रुतले जातात. अशा प्रकारे जे कामाच्या मागे लागले ते असे फुकट जातात ।। ८८ ।।

वारा शांत होऊन आकाशात विरून गेला म्हणजे तो वेगळा भासमान होत नाही पण तो आकाशात असतो. त्याप्रमाणे ज्ञानी झाला म्हणजे वेगळेपणाने भक्ती करताना दिसला नाही तरी त्याचा भक्तपणा ही संज्ञा संपत नाही. त्याची सेवेची आस्था शिल्लक राहते ।। ११४ ।।

### अध्याय आठवा

निर्विकल्प म्हणजे नित्य, शुद्ध (एकविसाव्या ओवीतील 'अमूर्त विशुद्ध') अशा परमात्म्याच्या ठायी जो आदिसंकल्पाचा अंकुर (एकोऽहं बहुस्याम् प्रजायेय)

फुटला, त्या निर्गुण, निराकार परब्रह्मास निर्विशेष (सत्ताविसाव्या ओवीमधील मूळ शून्य) असल्याकारणाने त्यास बरड माळरान म्हटले. त्या अंकुरांस अनंत ब्रह्मारूपी फळे लगडतात ।। २२ ।।

त्या ब्रह्मांडामध्ये ही पुढील स्थूल सृष्टी उत्पन्न करण्याची बीजे भरलेली असतात. (जसे उंबराचे प्रत्येक फळ बियांनी भरलेलेच असते) त्यामुळे उत्पन्न होणाऱ्या जीवसृष्टीचा हिशेबही लागत नाही ।। २३ ।।

नंतर त्या प्रत्येक ब्रह्मगोळकातून अपरिमित बहुविध सृष्टी मूळ आदी संकल्पाच्या प्रभावामुळे उत्पन्न होते ।। २४ ।।

योगी प्रयाणकाळी देह कसा ठेवतो याचे हे वर्णन आहे. त्याचा प्राणवायू हृदयाकाशात संचरून शरीरातील जड व चेतन अशा सर्व भागांचा लय करून भ्रूमध्यात स्थिर होतो. जसा घंटेचा नाद 'मुइंइंइं' करीत करीत घंटेमध्येच लय पावतो त्याप्रमाणे त्याचा प्राणवायू अमृतत्वात लीन होतो ।। ९७ ।।

प्रथम प्राणाचा ॐकारात लय करावा. तो ॐकार त्याच्या अ, ऊ, म या तीन मात्रा मूर्ध्न्याकाशात हळूहळू लय करीत करीत त्या तिन्ही मात्रांही अर्धमात्रेत म्हणजे ॐकाराचे वरील अर्धचंद्राकार बिंबात—साडे तीन मात्रेत लय करावा. हे धारणेच्या बलाने करावे ।। ११५ ।।

नंतर मात्रात्रयाचे अर्धबिंबात ऐक्य झाले असता जसा ओंकार शोभतो तसा तो प्राण मूर्ध्न्याकाशात लय पावून शोभतो ।। ११६ ।।

## अध्याय नववा

श्रीज्ञानदेव म्हणतात, श्रोतेहो आपण मजकडे पूर्ण लक्ष द्या म्हणजे तुम्ही सर्व सुखांस योग्य अधिकारी व्हाल. माझी ही उघड उघड प्रतिज्ञा आहे ।। १ ।।

परंतु महाराज, तुम्हा सर्वज्ञांच्या सभेमध्ये मी पांडित्याच्या आढयतेने असे बोलत नाही हो! तर 'एक लक्ष द्या' ही माझी आपणांस लडिवाळपणाची विनंती आहे ।। २ ।।

आपणांसारखे ज्ञानसंपन्न माहेर, समर्थ मातापितरे असतील तर लडिवाळाचेही लाड पूर्ण होतील आणि मनोरथांचीही इच्छा तृप्त होते ।। ३ ।।

महाराज! तुमच्या कृपादृष्टीच्या ओलाव्याने टवटवीत झालेले प्रसन्नतेचे मळे सर्वतोपरी विकसित झाले आहेत. त्या मळयांची थंडगार सुशीतल सावली पाहून, संसाराने श्रमलेला असा जो मी तो त्या ठिकाणी विश्रांतीसाठी लोळत आहे ।। ४ ।।

महाराज ! आपण समर्थ गोसावी असून सुखरूपी अमृताचे डोहच आहात म्हणून आम्ही आपल्या इच्छेप्रमाणे त्यात बागडून ओलावा प्राप्त करून घेत आहोत. या ठिकाणीही जर लडिवाळपणाने आपल्याशी सलगी करण्यास भिऊ लागलो तर शांत तरी कोठे व्हावे ।। ५ ।।

बालक बोबडया बोलांनी बोलते व वाकडया पावलांनी चालते पण त्याची आई त्याचे कौतुक करून अंतरी अतीव संतोष पावते ।। ६ ।।

त्याप्रमाणे महाराज आपल्यासारख्या संतांची प्रीती कोणत्या तरी निमित्ताने मजवर व्हावी या उत्कट इच्छेने आपल्याशी हा लडिवाळपणा करीत आहे ।। ७ ।।

नाही तर आपणांसारख्या सर्वज्ञ श्रोत्यास माझ्या बोलण्यापासून नवीन असे काही समजणार आहे, असे मुळीच नाही. अहो ! सरस्वतीपुत्राला क्रमाने धडे पाठ करवून त्यास विद्या शिकवावी लागते काय ? ।। ८ ।।

आता असे पहा की, हवा तेवढा मोठा काजवा असला तरी सूर्याच्या महातेजात तो मुळीच शोभत नाही. त्याप्रमाणे मी व माझे व्याख्यान आपल्या सर्वज्ञांच्या सभेत शोभून दिसणार नाही; मी याला काय करू ! ! अमृताच्या ताटात वाढण्याजोगी पक्वान्नांची पाकनिष्पत्ती कोठून करावी ? ।। ९ ।।

अहो ! शीतल किरण असलेल्या चंद्राला पंख्याने वारा घालणे किंवा साक्षात नादब्रह्मापुढे गायन करून त्यास ते ऐकविणे किंवा अलंकाराला अलंकार घालणे असे कधी कोठे असते काय ? ।। १० ।।

सांगा, सुगंधाने कशाचा वास घ्यावा ? समुद्राने कोणत्या स्थानी स्नान करावे ? हे सर्व आकाशच मावेल अशी मोठी वस्तू कोणती आहे बरे ? ।। ११ ।।

त्याचप्रमाणे तुमचे अवधान, श्रवणेच्छा तृप्त होईल आणि तुम्ही म्हणाल 'वा ! !' हे अती समाधानकारक व्याख्यान होय ! असे उत्कृष्ट वक्तृत्व जगात कोणाजवळ आहे ? ।। १२ ।।

तथापि विश्वाला प्रकाशित करणाऱ्या सूर्याला काडवातीने आरती करू नये की काय ? किंवा सर्व जलांचा स्वामी असणाऱ्या समुद्रास चुळकाभर पाण्याने अर्घ्य देऊ नये की काय ? ।। १३ ।।

सामर्थ्यसंपन्न स्वामी ! आपण शंकराचीच केवळ मूर्ती आहात, मी मात्र गरीब मनुष्य तुमची भक्तिभावाने पूजा करीत आहे. म्हणून माझे बोल जरी निरगुडीसारखे ठसेठोंबसे असले तरी आपण त्याचा स्वीकार करालच ।। १४ ।।

अहो ! लहान मूल आपल्या बापाच्या ताटात जेवावयास बसते व ताटात हात घालून प्रेमाने बापालाच घास भरवू लागते तेव्हा तो बापही संतोषाच्या भराने आपले तोंडच तो घास घेण्याकरिता त्याच्यापुढे करतो ।। १५ ।।

त्याप्रमाणे मी तुमच्याशी जरी विनोदाने, पोरबुद्धीने बडबड करीत आहे, तरीही तुम्ही त्या माझ्या बडबडीने संतोषितच व्हाल, असा प्रेमाचा जातिस्वभावच आहे ।। १६ ।।

आणि त्या आपलेपणाच्या प्रेमाच्या अतीव मोहाने युक्त आपण आहात. म्हणून आपण संतसज्जनांनी हा ज्ञानदेव आपला आहे, म्हणून अंगीकार केला आहे. म्हणूनच मी केलेल्या सलगीचे आपणास ओझे वाटणार नाही ।। १७ ।।

अहो ! गायीच्या तान्ह्या वासराने सडाला ढुसण्या दिल्या तर त्या योगाने गायीला अधिकच पान्हा फुटतो, त्याप्रमाणे जो अत्यंत प्रिय मनुष्य असतो त्या प्रेमळाच्या रागावण्याने त्याच्याविषयीचे प्रेमच दुणावत असते ।। १८ ।।

म्हणून महाराज ! मज लेकराच्या बोबड्या बोलण्याने तुमचे निजलेले कृपाळुपण जागे होईल असे मला वाटले. म्हणूनच मी 'अवधान एकले दीजे' असे आरंभी प्रतिज्ञावाक्य बोललो ।। १९ ।।

वास्तविक पाहता, गीतार्थाचे काम अवघड आहे. चांदणे कोणी आढीत घालून, दडपण ठेऊन पिकवितो की काय ? किंवा वाऱ्याला वाहण्याकरता कोणी गतिप्रवाहात घालीत असतो की काय ? तसेच आकाशाला गवसणी कशी घालावी ? ।। २० ।।

असे पहा की, स्वभावतःच पातळ असलेल्या पाण्यास पुन्हा पातळ करावे लागत नाही. लोण्यामध्ये रवीने कोणी घुसळीत नाही. त्याप्रमाणे गीतार्थाला पाहून लाजलेले माझे व्याख्यान माघारी परत फिरत आहे ।। २१ ।।

हे असो, ज्याच्यापुढे वेदरूपी सूर्य मावळल्यानंतर 'न इति न इति.' असे म्हणून वेदांचेही शब्द कुंठित होतात ते वेदही ज्या परमात्म्याच्या बाजेवर निवांत निजतात असा गीतार्थ मी मराठी भाषेत वर्णन करावा, अशी माझी योग्यता आहे काय ? ।। २२ ।।

परंतु अशाही योग्यताहीन मजला, गीतार्थ सांगण्याचे सामर्थ्य नसून ते धैर्य करीत आहे ते याच एका आशेवर की, कसेतरी धिटाईने बोलून आपल्यासारख्यांच्या कृपाप्रेमास अधिकारी व्हावे ।। २३ ।।

तर आता चंद्रापेक्षाही अती सुशीतल करणारे आणि अमृतापेक्षाही अधिक जीवन देऊन जगविणारे असे जे आपले अवधान आहे त्या आपल्या अवधानाने माझ्या मनोरथास वाढवून करून पूर्ण करावी ।। २४ ।।

कारण, जेव्हा तुमच्या कृपादृष्टीचा वर्षाव मजवर होईल, तेव्हा माझ्या बुद्धिरूप भूमीत सकलार्थ ज्ञानरूप धान्य पिकेल व मजला संपूर्णतया त्याचे स्फुरणदान होईल. एरवी जर तुम्ही अवधान देण्याबाबत उदासीन राहाल, तर अंकुरदशेत आलेले माझे ज्ञानही सुकून जाईल ।। २५ ।।

आता असे पहा की, सहजच वक्त्याच्या वक्तृत्वास आपल्यासारख्या श्रोत्यांचा अवधानरूपी चारा मिळाल्यावर त्याच्या प्रत्येक अक्षररूपी अवयवाला सिद्धांतरूपी पुष्टी पेलण्याचे सामर्थ्य येईल ।। २६ ।।

अर्थ हा आपल्या अभिव्यक्तीसाठी वक्त्याच्या मुखातून शब्द बाहेर पडण्याचीच वाट पाहील. शब्द बाहेर पडल्यावर एक अभिप्राय दुसऱ्या अभिप्रायास प्रसवेल आणि बुद्धीवर भाव, विभाव, अनुभाव इत्यादी भावांचा असा काही फुलोरा येईल की, त्यामुळे नवविध रस अर्थ व भावपूर्ण रीतीने अभिव्यक्त होऊन ओसंडू लागतील. त्यासाठी आपले अवधान असणे जरुरीचे आहे ।। २७ ।।

म्हणून श्रोत्याच्या व वक्त्याच्या प्रश्नप्रतिवचनात्मक तत्त्वबोधद्वारा हितकर असा संवादरूपी अनुकूल वारा वाहू लागला तर वक्त्याच्या हृदयाकाशात शास्त्रसिद्धांतरूपी व साहित्यरूपी मेघ वळून येतात पण श्रोता जर संत्रस्त चित्ताचा असेल तर वक्तृत्वात वक्त्याने श्रोत्यांसमोर मांडलेला रसही वितळून जाईल ।। २८ ।।

अहो ! चंद्रकांत मण्याला पाझर फुटतो हे खरे ; पण त्यास पाझरावयास लावण्याची चातुर्ययुक्ती चंद्राच्याच ठिकाणी असते. त्याचप्रमाणे वक्त्याच्या व्याख्यानात रसालंकारादी गुणांच्या आविष्कारास लागणारी शक्ती ही अवधान देणाऱ्या श्रोत्यांवर अवलंबून आहे. एकाग्र लक्ष देणाऱ्या श्रोत्यांविना वक्ता तो यथार्थ वक्ताच होऊ शकत नाही ।। २९ ।।

पण पहा, आता आम्हांला गोड करून घ्या अशी तांदुळांनी जेवणारांची विनंती करावी लागते काय किंवा कळसूत्री बाहुल्यांनी आम्हाला चांगले नाचवा म्हणून सूत्रधारास विनंती करावी लागते काय ? ।। ३० ।।

तो सूत्रधार काय बाहुल्यांच्या कामाकरिता नाचवितो, की स्वतःच्या कलाज्ञानाची कुशलता दाखवून चातुर्य वाढवीत असतो ? त्याप्रमाणे मी बाहुली आहे. आपण जसे बोलवाल तसे मी बोलणार किंवा 'अवधान द्या' वगैरे म्हणण्याच्या उठाठेवीचे काय काम आहे ।। ३१ ।।

त्यावेळी श्रीगुरु श्रीनिवृत्तिनाथ म्हणाले, अरे इतके बोलण्यासारखे झाले तरी काय ? आम्हांस 'अवधान एकले दीजे' या तुझ्या म्हणण्याचा सर्व काही अभिप्राय समजला. आता श्रीकृष्णांनी अर्जुनास सांगितले ते आम्हांस सांग ।। ३२ ।।

तेव्हा संतोष पावून श्रीनिवृत्तिनाथांचे दास ज्ञानदेव उल्हासाने म्हणाले, होय महाराज! ऐका तर श्रीकृष्ण असे बोलले ।। ३३ ।।

माझ्या स्वरूपाच्या आड येणारी माया आणि तुला भ्रमात पाडणारी कल्पना, त्या माया आणि कल्पना दोन्ही टाकून देऊन तत्पदलक्ष्यभूत व त्वंपदलक्ष्यभूत अखंडैकरस निरुपाधिक असे माझे यथार्थरूप पाहू लागलास तर तुला असे दिसून येईल की, माझ्या आश्रयावर सर्व भूते आहेत. असे आताच तुला सांगितले ते सर्व मिथ्या आहे. वस्तुतः भूते वगैरे काही नाही. सर्व काही मीच आहे असा निश्चय होईल ।। ७१ ।।

अशी वस्तुस्थिती असूनही संकल्परूप संध्याकाळचे वेळेस जिवाचे ज्ञानरूप डोळे अज्ञानरूप अंधकाराने काही वेळ झाकले जातात, बुद्धी दृष्टी मंद होते. म्हणून मी अखंडैकरस असता ते अस्पष्ट होते व भूते मजहून निराळी असल्यासारखी दृष्टीस पडतात ।। ७२ ।।

ज्याप्रमाणे माळेवरील रज्जूवरील सापाची भ्रांती गेल्याबरोबर माळ मूळ स्वरूपाने शिल्लक राहते, त्याप्रमाणे त्याच संकल्परूपी संध्याकाळची वेळ नाहीशी झाल्याबरोबर माझे अखंडित एकरस स्वरूपच अवशेष राहते ।। ७३ ।।

सहज विचार करून पाहिले तर भूतभेदाच्या प्रतीतीला पहाणाराचा अज्ञानजन्य संकल्पच कारण आहे. हे पक्के समज. घागरी, मडके, वगैरेंचे जमिनीतून आपोआप आकारात्मक कोंभ निघतात काय? तर नाही. परंतु कुंभाराच्या बुद्धीच्या कल्पनेचेच ते सर्व आकार उमटले आहेत ।। ७४ ।।

किंवा समुद्राच्या पाण्यात लाटांच्या काय खाणी आहेत? तर ते रूपांतरात्मक लाटांचे कृत्य वाऱ्याचे नाही काय?।। ७५ ।।

हे पहा ! कापसाच्या पोटात कापडाचे गठ्ठे आहेत काय? नेसणाऱ्याच्या समजुतीने तो कापूस कापड बनला आहे ! ।। ७६ ।।

जरी सोन्याचे दागिने बनविले तरी त्याचे सोनेपण नाहीसे होत नाही. बाकी स्थूल दृष्टीने वरपांग सोन्यापेक्षा वेगळे अलंकार भासतात. ते वापरणाराच्या कल्पनेनेच ।। ७७ ।।

आपल्या शब्दाची जी प्रतिध्वनिरूप प्रत्युत्तरे ऐकू येतात किंवा आरशात जे आपले प्रतिबिंब आपण पाहतो तो खरोखर आपल्या बोलण्याचा किंवा पाहण्याचा परिणाम आहे. किंवा आपल्या पूर्वीच ते तेथे खरेपणाने होते? सांग बरे ? ।। ७८ ।।

त्याप्रमाणे ह्या माझ्या निरुपाधिक विशुद्ध स्वरूपावर जो भूतांच्या कल्पनेचा आरोप करतो, त्याला त्याच्याच कल्पनेमुळे माझ्या ठिकाणी भूतांचा भास होतो ।। ७९ ।।

तीच कल्पना करणारी प्रकृती संपली म्हणजे माझ्या ठिकाणचा भूतांचा भास वस्तुत: अगोदरच संपलेला असतो. मग माझे निरुपाधिक असे स्वरूप तेच निखालस एकसारखे उरते ॥ ८० ॥

हे असो, आपण आपल्या भोवती गरगर फिरले असता अंगात भोवंड आल्यामुळे ज्याप्रमाणे भोवतालची गिरिकंदरे वगैरे फिरताना अशी दिसतात. त्याप्रमाणे आपल्याच कल्पनेमुळे अखंड ब्रह्मस्वरूपात भूतांचा भास होतो ॥ ८१ ॥

तीच कल्पना सोडून पाहिले तर मी भूतांच्या ठिकाणी व भूते माझ्या ठिकाणी आहेत अशी स्वप्नातदेखील कल्पना करता येणार नाही ॥ ८२ ॥

आता 'मीच एक भूतांचा धारण करणारा अथवा भूतांचा असणारा' या सर्व गोष्टींची बोलणी संकल्परूप सन्निपात वायूतील वडबडी आहेत ॥ ८३ ॥

म्हणून हे प्रियोत्तमा ! ऐक. अशा प्रकारे मी सृष्टीचा विश्वात्मा किंवा या मिथ्या भूत समुदायास सदा आधार आहे ॥ ८४ ॥

ज्याप्रमाणे सूर्याच्या किरणाच्या आधारावर मिथ्या मृगजळ केवळ भासते एवढेच. त्याप्रमाणे माझ्या निर्गुण स्वरूपाचे ठिकाणी सर्व भूते मिथ्या आहेत असे समज. इतकेच नव्हे तर मीही एक त्यांच्यामध्ये अधिष्ठानरूपाने व्याप्त असून त्रिकालाबाधित सत्य आहे असे समज ॥ ८५ ॥

ह्या प्रकारे करून मी भूतांचा उत्पत्तिकर्ता आहे असे म्हणतात. ज्याप्रमाणे सूर्य व सूर्याची प्रभा ही दोन्हीही एकच असतात, त्याप्रमाणे भूते व मी वास्तविक एकच आहोत ॥ ८६ ॥

जिच्या तोंडात द्वेषरूप दाढा ज्ञानाचा चावून चुराडा करतात व जी अगस्ती ऋषीला असलेल्या कुंभाच्या आवरणाप्रमाणे स्थूलबुद्धीच्या मूर्ख लोकांना आवरण करणारी जणू गवसणीच आहे ॥ १८३ ॥

(यापुढे महाराज क्रमाने अष्टांगयोगाचे वर्णन करतात) बाहेरच्या बाजूस यम-नियमाचे काटेरी कुंपण लावून त्या आत मूळबंधाचा, वज्रासनाचा कोट तयार केला व त्या कोटावर प्राणायामरूपी सतत चालू असणाऱ्या जणू आग ओतणाऱ्या तोफा ठेविल्या ॥ २१३ ॥

नंतर समाधीचे संपूर्ण ऐश्वर्य ज्या ब्रह्मात्मैक्यानुभवात्मक सामरस्यामुळे झाले त्या आत्मानुभवाच्या राज्यसुखावरच त्या योग्याला अभिषेक झाला ॥ २१८ ॥

तर 'ज्ञानयज्ञ' तो अशा स्वरूपाचा आहे की, ज्या ज्ञानयज्ञात (मी एक असलेला अनेक रूपांनी व्हावे) असा जो आदिसंकल्प हाच पशू बांधावयाचा यज्ञस्तंभ होय. पंचमहाभूते हा यज्ञ मंडप आहे. (जीव व ईश्वर यांच्यातील भेद हाच पशू आहे) ।। २३९ ।।

मग पंचमहाभूतांचे शब्दस्पर्शादी विशेष गुण अथवा पाच इंद्रिये आणि पंचप्राण हीच यज्ञाची साहित्य सामग्री होय व ब्रह्माविषयी जे अज्ञान तेच तूप आहे ।। २४० ।।

हे अर्जुना! ज्या यज्ञात मन व बुद्धी ही दोन कुंडे असून त्यात ज्ञानरूपी अग्नी प्रदीप्त केला जातो. (सुख व दु:ख द्वंद्वाविषयी चित्ताची) जी समता हीच वळकट वेदिका म्हणजे यज्ञकुंडाचा ओटा आहे, असे तू समज ।। २४१ ।।

आत्मानात्म विचार करण्याविषयी जी बुद्धीची कुशलता तीच यज्ञातील मंत्र होत. विद्येची महती स्रुक व शांतिस्रुवा ही (स्रुक व स्रुवा ही दोन लाकडी पळ्यांसारखी यज्ञपात्रे असतात) व जीव हा यज्ञ करणारा यजमान असतो ।। २४२ ।।

तो यज्ञ करणारा जीव स्वानुभवरूप पात्रांनी ब्रह्मविचाररूपी महामंत्रांनी ज्ञानरूप अग्निहोत्र कर्माने जीव व ईश्वर यांच्या भिन्नपणाची आहुती देऊन तो भेद नाहीसा करतो ।। २४३ ।।

त्यावेळेस अज्ञानरूपी तूप सरून जाते. यज्ञ करणारा व यज्ञक्रिया ही जागचे जागीच थांबतात. नंतर आत्मब्रह्मात्मैक्यरसात–आनंदरूपी पाण्यात–जीवरूपी यजमान जेव्हा अवभृत स्नान करतो ।। २४४ ।।

तेव्हा यज्ञकर्ता, पंचमहाभूते, शब्द, स्पर्श, इत्यादी विषय व इंद्रिये ही वेगळाली आहेत असे राहत नाही. कारण, तो ब्रह्मात्मैक्य बुद्धीमुळे ही सर्व ब्रह्मरूपच आहेत असे तो ज्ञानी जाणतो ।। २४५ ।।

त्यावेळी पुन्हा जग निर्माण करण्याकरिता वासनात्मक संकल्पाचे सूक्ष्म संस्कार ज्या ठिकाणी अमर होऊन राहतात ते ठिकाणही मीच आहे ।। २९५ ।।

## अध्याय दहावा

हे श्रीगुरो! आपण ब्रह्मज्ञानाचा स्पष्ट नि:संदेह बोध करण्याचे बाबतीत चतुर आहात. ब्रह्मविद्यारूपी कमलास विकसित करणारे आहात. परा वाणीचा विषय जी स्वरूपस्थिती हीच कोणी एक तरुण स्त्री, तिच्याशी विलास करणारे आहात. आपणांस माझा नमस्कार असो ।। १ ।।

संसाररूपी अंधकाराचा नाश करणारे आपण सूर्य आहात. आपले निस्सीम व सर्वोत्कृष्ट सामर्थ्य आहे. जागृतादी अवस्थात्रयाहून श्रेष्ठ चौथी तारुण्याची ज्ञानरूप अवस्था आहे. तारुण्यात त्या तुर्यावस्थेचे पालन करणे हा तुमचा लीलाविलास आहे. आपणांस माझा नमस्कार असो ।। २ ।।

सर्व जगाचे पालन करणारे आहात. कल्याणरूप रत्नांची खाण आहात. सज्जनरूपी वनातील चंदनासारखे श्रेष्ठ आहात. तुम्ही आराधन करण्यास योग्य आहात. शिवलिंगस्वरूप आपण आहात त्या आपणांस माझा नमस्कार असो ।। ३ ।।

भक्तांच्या चतुरचित्तरूपी चकोर पक्ष्यास आनंद देणाऱ्या चंद्रा, ब्रह्मानंदानुभवाच्या राजा, श्रुतीच्या तात्पर्य विषयीभूत ज्ञानाच्या सैद्धांतिक संग्रहरूपी समुद्रा, मदनासही गर्वहरणपूर्वक मोहित करणाऱ्या लोकोत्तर मदना, आपणांस माझा नमस्कार असो ।। ४ ।।

शुद्ध भावयुक्त ज्ञानाच्या भजन भक्तीस पात्र आहात. संसाररूपी हत्तीचे गंडस्थळ फोडणारे सिंह आहात. जगत उत्पत्तीचे आश्रयस्थान आहात. हे श्रीगुरुराया तुम्हांप्रत माझा नमस्कार असो ।। ५ ।।

जगात सर्वत्र शब्दांचे (बोललेल्या व लिहिलेल्या) अरण्य माजले आहे. पण त्यात खरे अंतिम कल्याण करणारे फलप्रद असे एक अक्षर आढळणे दुर्मिळ आहे. परंतु तुम्ही (श्रीगुरुमूर्तींनी) मात्र माझ्या वाचेकडून भगवद्‌गीतेचे व्याख्यान करवून माझ्या वाणीची, विवेकाची कल्पलता केली आहे. (कारण सामान्य कल्पवृक्ष मूर्खांस मागतील तशी नाशिवंत व हानिकारक फळे देतो) तशी ही कल्पलता नाही ।। २० ।।

नवव्या अध्यायाचा अभिप्राय इतका व्यापक व सखोल आहे की, त्यास शिक्का करणे (अनुमोदन देऊन मान्यता देण्यास) भीती वाटते. त्याचे मी सम्यक् व्याख्यान केले असा गर्व मी कशास वाळगू असे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात ।। ३२ ।।

## अध्याय अकरावा

आता यापुढे अकराव्या अध्यायातील जी कथा आहे ती दोन रसांनी भरलेली आहे. या अध्यायात भगवंताच्या विश्वरूपाची अर्जुनास भेटही होईल ।। १ ।।

या अध्यायात शांतरसाच्या घरी अद्‌भुत रस हा एक पाहुणा आलेला आहे आणि त्याच्यावरोबर शृंगार, हास्य, वीर इत्यादी इतर सर्व रसांसही पंक्ती भोजनाचा यथोचित मानसन्मान मिळाला आहे ।। २ ।।

अहो ! वधूवरांच्या लग्नात इतर वऱ्हाडयांनाही वस्त्रालंकारांनी विभूषित करतात. त्याप्रमाणे मराठी भाषेच्या मुखासनावर शांत रसाबरोबर इतर सर्व रसांसही मिरवणुकीचा लाभ मिळाला आहे ।। ३ ।।

परंतु त्यातही या अध्यायात शांत आणि अद्‌भुत हे दोन रस डोळयांच्या अंजुलीने प्रत्यक्ष घेता यावेत इतके उत्कृष्ट शोभले आहेत, जणू शंकर व विष्णू हे दोन देव एकमेकांस प्रेमभावाने आलिंगन देण्याकरिताच आले आहेत ।। ४ ।।

किंवा अवसेच्या दिवशी सूर्य आणि चंद्र ही दोन्ही एकत्र येऊन सारख्या रूपाने भेटतात त्याप्रमाणे या अध्यायात शांत व अद्‌भुत या दोन रसांचे ऐक्य झाले आहे ।। ५ ।।

गंगा व यमुना या दोन नद्यांचे ओघ एकमेकांत मिळून संगम व्हावा त्याप्रमाणे शांत व अद्‌भुत या दोन रसांचे संगमस्थान म्हणजेच हा अकरावा अध्याय असून तो जणू प्रयागक्षेत्रच बनला आहे. म्हणून अखिल विश्व या अध्यायरूपी संगमात न्हाऊन पवित्र होत आहे ।। ६ ।।

या दोन रसांच्या संगमात गीतारूपी सरस्वती ही मात्र गुप्त आहे. शांत व अद्‌भुत या दोन रसांचे ओघ गंगा-यमुनांच्या ओघाप्रमाणे स्पष्ट दिसत आहेत. म्हणून बापांनो ! हा अकरावा अध्याय म्हणजे उचित असा त्रिवेणी संगम असून त्याचा योग आपणा सर्वांस प्राप्त झाला आहे असे समजा ।। ७ ।।

या त्रिवेणी संगमामध्ये कानाच्या द्वाराने प्रवेश करणे, माझ्या ज्ञानदात्या श्रीगुरु निवृत्तिनाथाने अतिशय सोपे केले आहे ।। ८ ।।

गीतेची संस्कृत भाषारूपी कठीण तीरे होती. ती फोडून धर्मनिधान श्रीगुरु निवृत्तिनाथांनी मराठी भाषेतील शब्दरूपी पायऱ्यांचे सोपे घाट बांधले आहेत ।। ९ ।।

म्हणून आता कोणीही या त्रिवेणी संगमरूपी तीर्थात भक्तिभावाने स्नान करावे व या प्रयागक्षेत्रातील माधवरूप विश्वरूपाचे दर्शन घ्यावे, आणि जन्ममरणरूपी संसारास कायमचे तिलोदक द्यावे ।। १० ।।

भूमी, आप, तेजादी पंचमहाभूते म्हणजे अपरा प्रकृती जेव्हा ब्रह्मात लय पावते ! तसेच जीव (परा प्रकृती) व महत्‌तत्त्वादी सूक्ष्मसृष्टी ज्यावेळी लीन होते त्यावेळी भगवान ज्या आपल्या शुद्ध निर्विकल्प निजस्वरूपात अखेरची विश्रांती घेतात. ते देवाचे अध्यात्म्य (गूढ स्वरूप) तुम्ही मला दाखविले ।। ४५ ।।

अर्जुन म्हणतो देवा, तुम्ही मला आतापर्यंत (सातव्या अध्यायापासून दहाव्या अध्यायापर्यंत) सृष्टी उत्पत्ती व लयास कारणीभूत असणारी प्रकृती तिचा उलगडा केला. तसेच ज्या पुरुषाच्या महिम्यामुळे वेदांना श्रेष्ठता प्राप्त झाली आहे त्या परमात्म्याचे मूळ स्थानही तुम्ही मला दाखविले ।। ७१ ।।

जगाचे कल्याण करणारा व हित दाखविणारा असा बहुमोल रत्नासारखा जो धर्म तो (शब्दब्रह्म) वेदांपासून लाभतो. हा महिमा वेदांना, हे प्रभो ! तुमच्या चित्स्वरूपाची चरणसेवा केल्यामुळे (आश्रयामुळे) लाभला आहे ।। ७२ ।।

तुम्ही आपले विश्वरूप मला सहज दाखवाल असा मला भरंवसा आहे. कारण, तुमचे औदार्य जाणत्यानेणत्यांना नित्यनूतन असे प्राप्त होते ।। ९७ ।।

अर्जुन भगवंतास म्हणाला की, हे भगवंता ! तुम्ही देवाधिदेव महाविष्णू आहात, तुम्ही सर्व विश्वात व्यापून राहिले आहात. परंतु विश्वाची उत्पत्ती, स्थिती व लय यांपैकी प्रस्तुत स्थितीकाळी तुमच्या अधीन असता ते विसरून तुम्ही संहार (रुद्राचे कार्य) का सुरू केले आहे ? ।। ३८४ ।।

## अध्याय बारावा

हे श्रीगुरुकृपादृष्टी माते ! तुझा जयजयकार असो. तू अविद्यादी मलरहित अत्यंत विशुद्ध आहेस. उदारत्वाचे वावतीत व निरंतर आनंदाचा वर्षाव करण्याविषयी प्रसिद्ध आहेस ।। १ ।।

विषयरूपी सर्पाने दंश केल्यावर मूर्च्छित झालेल्या मनुष्याचे विष काही केल्या जात नाही, तो त्या मूर्च्छेतून उठत नाही पण हे श्रीगुरुकृपादृष्टी, तुझ्या योगाने मात्र विष उतरून तोही मूर्च्छेतून उठतो ।। २ ।।

हे श्रीगुरुकृपादृष्टी, तुझ्या प्रसादरूपी पाण्याच्या लाटांच्या असणाऱ्या पुराने भरून तू येशील, तर मग त्रिविध ताप कोणाला पोळणार व शोक तरी कोणास जाळू शकेल ।। ३ ।।

हे स्नेहाळे कृपादृष्टी, तुझ्या कृपेपासून तुझ्या सेवकाला योगसुखाचा सोहळा उपभोगावयास मिळतो. मी ब्रह्मरूप आहे अशा अभेद बोधाची जी तुझ्या सेवकांची हौस आहे तीही तू पूर्ण करतेस ।। ४ ।।

तू आपल्या सेवकांना मूलाधार शक्तीच्या मांडीवर कौतुकाने वसवून वाढविनेस आणि त्या हृदयाकाशरूपी पाळण्यात घालून आपल्या उपदेशाने वृत्तिलयस्वरूप निद्रा लागण्यासाठी शमदमरूपी झोके त्यास देतेस ।। ५ ।।

ब्रह्मात्मैक्य ज्ञान-प्रकाशरूप आत्मज्योतीने ओवाळतेस व अष्टांगयोगद्वारा मन व पवन त्यांचे स्वाधीन करून देण्यासाठी हीच जणू खेळणी त्या बाळकाच्या हाती देतेस. त्या बाळकाच्या अंगावर आत्मसुखाचे बाळलेणेही तूच घालतेस ।। ६ ।।

सतरावी जीवनकलारूपी अमृताचे दूध पाजतेस, अखंड अनुहतध्वनीचे गाणे गातेस व ब्रह्मात्मैक्य बोधाने त्याची समजूत घालून साधकास अमनस्क समाधिसुखात निजवितेस ।। ७ ।।

म्हणून तू साधकाची माऊली आहेस. तुझ्या चरणाच्या आश्रयाने सर्व विद्या फलद्रूप होतात, याच कारणाने मी तुझ्या चरणाचा आश्रय सोडीत नाही ।। ८ ।।

अहो ! सद्‌गुरूचे कृपादृष्टी ! तुझी कृपा ज्याचा अंगीकार करते तो सर्व विद्यारूपी सृष्टीचा निर्माणकर्ताच होतो ।। ९ ।।

म्हणून हे श्रीमान अंबे ! माते ! तू सेवकाच्या मनातील इच्छा पूर्ण करणारी कल्पलताच आहेस. तर आता मला या गीतेचा अर्थ सांगण्यासाठी आज्ञा दे ।। १० ।।

कारण, वैराग्यरूप मोठ्या अग्नीने विषयरूप सैन्ये जाळून ज्यांनी आपली होरपळलेली इंद्रिये मोठ्या कष्टाने, धैर्याने आवरून धरिली ।। ४६ ।।

मग इंद्रियांस आत्मसंयमनाचे पाशाने अंतर्मुख करून हृदयाच्या गुहेत ती कोंडली ।। ४७ ।।

अपान वायूच्या द्वाराला आसनाची बळकट मुद्रा लावून मूळबंधाचा बुरुज उभा केला ।। ४८ ।।

आशेचे संबंध तोडून टाकिले व अधीरपणाचे कडे ढासळून दिले व निद्रारूप अंधार पार नाहीसा केला ।। ४९ ।।

मूळबंध आसनाच्या ज्वालाग्नीने शरीरातील सप्तधातूंची होळी करून व्याधीची शिरे प्राणापानरूपी तोफांना बळी म्हणून अर्पण केली ।। ५० ।।

मग कुंडलिनीयेचा टेंभा आधारचक्रावर उभा करून मध्यमापर्यंतचा मार्ग प्रकाशित करून त्या उजेडात आनंदाने मस्तकापर्यंतचा भाग जाणला जातो ।। ५१ ।।

शरीरातील नऊ इंद्रियांच्या द्वारांच्या कवाडावर निग्रहाचे अडसर लावले व सुषुम्ना नाडीची किंवा कंठगत विशुद्ध चक्राची खिडकी म्हणजे वाट मोकळी केली ।। ५२ ।।

कुंडलिनी शक्तिरूप चामुंडा देवी असून तिच्या प्रीत्यर्थ संकल्परूपी मेंढे व मनोरूपी महिषांची मुंडे (मस्तके) बळी देतात ।। ५३ ।।

इडा व पिंगळा या नाड्यांचे सुषुम्नेमध्ये ऐक्य करून व अनुहतध्वनीचा गजर करून भ्रूकुटीमधील सतराव्या जीवनकलेच्या तलावाचे अमृत जिंकतात ॥ ५४ ॥

मग सुषुम्ना नाडीच्या मध्य विवरातील, त्या नाडीतील पोकळीमधील, कोरीव दादराने वर चढून प्राणशक्ती वर नेऊन मस्तकातील ब्रह्मरंध्राच्या उंचवट्यापर्यंत मजल गाठतात ॥ ५५ ॥

नंतर ओंकाराची तिसरी मकार मात्रेची कठीण जिन्याची शेवटची पायरी चढून म्हणजे मस्तकाकाशाचा लय करून परब्रह्मास मिळतात ॥ ५६ ॥

याप्रमाणे सर्वत्र सारखी बुद्धी ठेवून 'सोहंसिद्धि' प्राप्त करून घेण्याकरिताच योगादिक मोठे कठीण मार्ग किंवा किल्ले वेळ न लावता स्वाधीन करून घेतात ॥ ५७ ॥

अशा प्रकारे अर्जुना ! आपला जीव मोबदल्यात देऊन शून्य (अव्यक्त, अक्षर, कल्पनाशून्य परब्रह्म) अति त्वरित घेतात ॥ ५८ ॥

बाकी माझ्या प्राप्तीशिवाय, योगाच्या बळाने म्हणून त्यांना अधिक काही लाभ होतो असे मुळीच नाही. उलट जास्त कष्ट मात्र सोसावे लागतात ॥ ५९ ॥

सर्व प्राणीमात्रांचे प्रिय, सर्व भूतांचे हितच, निराश्रय व अव्यक्त असे जे ब्रह्म ते, सगुण भक्तीशिवाय प्राप्त करून घेण्याची जे इच्छा करतात व ती पुरती वाढवितात ॥ ६० ॥

या योगाभ्यासात रोज नित्यनव्याने जीवावर उदार होऊन मरणाबरोबर झुंज खेळावी लागते. मरणाबरोबर झुंज मनुष्य एकतर स्वामीभक्तीने घेतो किंवा वाड-वडिलांच्या आदेशाने त्यांच्या इच्छा पूर्ण करण्यासाठी घेतो. परंतु येथे ही दोन्ही निमित्ते नसताही मरणाशी झुंज घ्यावी लागते ॥ ६७ ॥

अमुक कर्म परिपूर्ण झाले व अमुक कर्म परिपूर्ण न झाले तरी त्याविषयी मनात हर्षखेद मानू नकोस व तू आपले जीवित्व परमात्म्याशी एकरूप करून टाक ॥ ११९ ॥

बुद्धीच्या पाठीपोटी देवास–ईश्वरास–जोडणे म्हणजे कर्माचा संकल्प प्रथम उत्पन्न होतो तोच ईश्वरस्मरणपूर्वक असणे व नंतर निश्चय होतो तोही ईश्वरविषयक व्हावा. तसेच कर्माचे आरंभी (निरहंकारवृत्ती) म्हणजे ईश्वरच कर्ता करविता आहे हे स्मरण व कर्माचे शेवटी कर्मफळ ईश्वरार्पण करणे हे देवास आदी अंती जोडणे होय. हेही जर तुला कठीण वाटत असले तर— ॥ १२६ ॥

जेव्हा कर्म आपोआप दूर राहते तेव्हा कर्मफलत्याग म्हणजे फलाची इच्छा सहजच नाहीशी होते. असे झाल्यावर ब्रह्मप्राप्तिरूप शांती आपल्या स्वाधीन होते ।। १३९ ।।

यापूर्वीच्या श्लोकात सांगितलेल्या प्रयत्नपूर्वक अभ्यासाहून सम्यक् ज्ञान श्रेष्ठ आहे. त्या ज्ञानाचे भावनेत पर्यवसान होऊन निदिध्यासाने त्याचे ध्यान हे त्याहून श्रेष्ठ आहे. अशा ध्यानात चित्तातील सर्व भाव लीन होतात ।। १४१ ।।

मग सर्व भावांचा लय झाल्याकारणे कर्म जात सर्व आपोआप दुरावते. कर्मच दूर गेल्यावर फलत्याग आपोआपच होतो. अशा फलत्यागाने सर्व कामनांचा नाश होऊन शांती प्राप्त होते ।। १४२ ।।

हे महावीरा ! यांप्रमाणे हे ब्रह्मरूप प्राप्तीचे मार्ग असून याच टप्प्याने ज्याने शांतीचे माजघर प्राप्त करून घेतले आहे ।। १४३ ।।

## अध्याय तेरावा

ज्या आत्मरूप श्रीगणेशाचे स्मरण केले असता तो अखिल विद्यांचे आश्रयस्थान होतो. त्या श्रीगुरूच्या चरणांस वंदन करू ।। १ ।।

श्रीगुरूचे स्मरण केले असता कवीस सर्व शब्दसृष्टीच स्वाधीन होते आणि सर्व वाङ्मयशास्त्र त्याच्या जिव्हेस प्राप्त होतात ।। २ ।।

त्याच्या वक्तृत्वास इतके माधुर्य येते की, ते आपल्या गोडीने अमृताच्या गोडीसही पलीकडे सर म्हणते. शांत, अद्‌भुत इत्यादी नवरस त्याच्या मुखातून निघणाऱ्या प्रत्येक अक्षराचे आज्ञाधारक सेवक होतात ।। ३ ।।

त्याच्या स्मरणाने गर्भितार्थरूप अभिप्राय वा रससंपत्तीस अभिव्यक्त करणारे भाव प्रकट होतात. तात्त्विक सिद्धांताचे प्रकार अभिव्यक्त करणारी मार्मिक खूण हस्तगत होते ।। ४ ।।

जेव्हा आपल्या अंतःकरणात श्रीगुरूचे चरण वास्तव्य करतात तेव्हा स्मरण होऊन ज्ञानरूपी भाग्योदय होऊन त्यास एवढे मोठे भव्य स्वरूप प्राप्त होते ।। ५ ।।

ज्याच्या चरणस्मरणाने असे सर्व लाभ होतात, त्या श्रीगुरूंच्या श्रीचरणांस वंदन करून मी हे धर्म कीर्तन करतो. आता या अध्यायात ब्रह्मदेवाचा पिता व लक्ष्मीचा पती असणारा भगवान श्रीकृष्ण परमात्मा असे म्हणाला ।। ६ ।।

या क्षेत्राच्या स्वरूपाचा निर्धार करण्यासाठी अनुष्टुभादी छंदात निरनिराळे प्रबंध ईर्ष्येने अद्यापपावेतो (ग्रंथरचना) केले जात आहेत ।। ६७ ।।

तसेच मंत्रद्रष्टे पवित्र ऋषी, वेदांतील बृहत्सामसूत्र वर्णन करतात. पण त्यांनाही हे क्षेत्र कसे आहे ते कळत नाही ।। ६८ ।।

ज्याप्रमाणे एखादा दांडगा नवरा आपल्या स्वैरपणे घराबाहेर धीटपणे जाणाऱ्या बायकोस बंदोबस्तात ठेवतो, त्याप्रमाणे 'आत्मविनिग्रह' करणारा ज्ञानी पुरुष आपल्या अंतःकरण वृत्तीला विषयाकडे जाऊ न देता त्यावर नित्य पहारा ठेवून दक्ष राहतो ।। ५०६ ।।

म्हातारपण आल्यावर हातपायांच्या हालचाली थंड पडतात. जसे कमनशिबी माणसाचा धंदा बसतो किंवा चांगला मंत्री नसल्यावर राजाचे बळ कमकुवत असते त्याप्रमाणे वृद्धाच्या अंगातील बळ–शक्ती क्षीण होते ।। ५५७ ।।

ज्याप्रमाणे 'आकाश' हे सर्व व्याप्त असताही कोणत्याच पदार्थाचा लेप त्यास लागत नाही, त्याप्रमाणे नित्य समचित्त असणाऱ्या ज्ञानी पुरुषाचे ठायी सुखदुःख, इष्टानिष्ट इत्यादींबद्दल समदृष्टी असते. म्हणून त्याचे ठायी उघड ज्ञान असते ।। ६०३ ।।

## अध्याय चौदावा

हे श्रीगुरो ! हे आचार्या, तुमचा जयजयकार असो. तुम्ही सकळ देवांत श्रेष्ठ आहात. ब्रह्मात्मैक्य ज्ञानविषयक बुद्धिरूप प्रातःकाळचा उदय करणारे सूर्य आहात. अखिल विश्वाच्या नित्यसुखासाठीच ज्यांचा खरा उदय करणारे आपण आहात ।। १ ।।

हे श्रीगुरो ! तुम्ही सर्वांचे विश्रांतिस्थान आहात. सर्वांच्या अंतःकरणात 'ते ब्रह्म मी आहे' या वृत्तीचा उदय करून, अद्वयानंदाचे सेवन करविणारे आहात. भिन्न भिन्न अशा चौदा भुवनरूपी लाटांचे आपण समुद्रच आहात. तुमचा जयजयकार असो ।। २ ।।

हे दीनबंधो ! नित्य कारुण्याच्या सागरा आपण स्पष्ट ब्रह्मविद्यारूपी वधूचे पती आहात. हे श्रीगुरो ! ऐका महाराज ! ।। ३ ।।

तू अज्ञान्यांना अज्ञानाच्या आवरणाने आच्छादित करून लपतोस. त्यांना तू आपल्या स्वरूपाच्या ठिकाणी हे वस्तुतः नसलेले विश्व दाखवितोस आणि ज्या ज्ञानी लोकांसाठी आपले स्वरूप प्रकट करतोस त्यांना जगत प्रतीती नाहीशी करून सर्व रूपाने तूच तू होतोस ।। ४ ।।

गारुडी आपल्या खेळात दुसऱ्यांची दृष्टी प्रतिबद्ध करणारा असा नजरबंदीचा खेळ करीत असतो; पण तो गारुडी आपली स्वतःची दृष्टी चोरीत नाही. आपली नजर त्याला लपविता येत नाही. परंतु हे श्रीगुरो ! आपला चातुर्य प्रकार मात्र त्याहून भिन्न व नवलपूर्ण आहे. आपण अज्ञानावरणात लपून बसून जगत दाखविता, आणि आपणच अहंब्रह्मास्मित्याकारक वृत्तीद्वारा अद्वय ब्रह्मरूपाने अभिव्यक्त होता व विश्वाभास नाहीसा करता, असा आपला अद्भुत जादूचा खेळ आहे ।। ५ ।।

महाराज, या सर्व जगाला तूच अधिष्ठानरूपाने मुख्य आधार आहेस. तरीही त्यात कोणास तुझे यथावत ज्ञान आहे, तर कोणास तुझ्या यथार्थ स्वरूपाविषयी अज्ञान आहे. असा आपल्याच ठिकाणी एकाच वेळी दोन्ही खेळ, परस्पर विलक्षण स्वरूपाने सुरू आहेत अशा तुला माझा नमस्कार असो ।। ६ ।।

जगतात जे पाणी आहे त्यातील द्रवरूपता व गोडी तुझ्या जिव्हाळ्याने त्यास आली आहे व पृथ्वीला जी सहन करण्याची शक्ती लाभली आहे तीही तुमच्याचमुळे लाभली आहे ।। ७ ।।

चंद्र व सूर्य हे मोठ्या शिंपल्याप्रमाणे असून ते या तिन्ही लोकांस जो प्रकाश पाडतात तो तुमच्या तेजाच्या शक्तीच्या सान्निध्याचाच प्रभाव आहे ।। ८ ।।

महाराज ! चहूंकडे फिरणारा जो वायू तो तुमच्याच लोकोत्तर, असीम शक्तीमुळे हालचाल करीत असतो. आणि एवढे मोठे आकाश असले तरी पण ते तुमच्या पोटातच लपंडाव खेळते. आपण आकाशापेक्षा व्यापक आहात ।। ९ ।।

फार काय सांगावे ! ! जी माया सर्व विश्वाभासास कारण आहे तीही आपल्याच सत्तास्फूर्तीमुळे एकदेशाचे ठिकाणी आहे. बुद्धिवृत्तीत विषयप्रकाशक जे ज्ञान आहे, तेही आपल्याच स्फूर्तीप्रदानाने आहे. हे वर्णन असो. कारण, आपले वर्णन श्रुतीलाही करण्यात श्रम होतात ।। १० ।।

वेद तुझे वर्णन करण्यात तोपर्यंतच चातुर्यसंपन्न आहे की, जोपर्यंत तुझ्या शुद्ध ब्रह्मस्वरूपाचे त्यास दर्शन झाले नाही. मग तुझे शुद्ध स्वरूपाचे दर्शन झाल्यावर आम्हाला व त्यालाही एकाच पंक्तीला बसून मूग खावे लागतात; म्हणजे मौन धारण करावे लागते ।। ११ ।।

महाराज, सर्वत्र जलप्रलय होऊन त्यात थेंबादिकांची खिजगणती जशी नाही. तेथे ही मोठी, ही लहान नदी म्हणूनही ओळखता येईल काय ? ।। १२ ।।

सूर्य उगवल्यानंतर जसा चंद्र आणि काजवा समानच असतात त्याप्रमाणे तुझ्या शुद्ध स्वरूपाचे वर्णन करण्याचे बाबतीत माझी व श्रुतीची स्थिती समान अशीच होते ।। १३ ।।

ज्या ठिकाणी वर्ण्य विषय, वर्णन करणारा असा द्वैताचा आधारच पार नष्ट होतो, जेथे परेसह वैखरी वाणी बुडून जाऊन स्तब्ध राहते तेथे शब्दास अविषय असणाऱ्या तुझ्या स्वरूपाचे कोणत्या तोंडाने वर्णन करावे बरे ! ।। १४ ।।

म्हणूनच आता तुमची स्तुती करण्याचे सोडून देऊन मुकाट्याने व निवांतपणाने तुमच्या चरणावर मस्तक ठेवावे हेच चांगले होय ।। १५ ।।

विषय व इंद्रिये यांचा भूताशी संबंध असल्यामुळे त्यांचीही ह्या महाभूतांचे बरोबरच स्पष्टता होते ॥ ९३ ॥

इरसाल मूर्खपणा म्हणजे दारूच आहे. मनुष्य त्यामुळे बोलू नये ते बरळतो व अव्हासव्हा वागतो. अशा या दारूचे भांडे म्हणजे तमोगुणी किंवा मोहनास्त्र घातलेल्या माणसास आपण कोण आहोत याचीच शुद्ध राहत नाही. त्याप्रमाणे तमोगुणी पुरुषाची अवस्था होते ॥ १७६ ॥

प्रलय काळी स्थूलाचा लय सूक्ष्मात होतो. या पद्धतीने महदादिकांचा विचाराने लय होऊन शेवटी ज्या परब्रह्म स्वरूपाचे ठायी विचारही मावळतो ॥ २२३ ॥

असे जे ते परब्रह्म–परमतत्त्व–तुम्ही छत्तीस तत्त्वे मानली तर परब्रह्म सदतिसावे तत्त्व आहे. आणि तुम्ही चोवीस तत्त्वे मानीत असाल तर हे पंचविसावे आहे. तसेच तीन गुण, तीन अवस्था मानीत असाल तर हे चतुर्थ आहे. एकूण हे सर्वश्रेष्ठ सर्वतोपरी उत्तम आहे ॥ २२४ ॥

येथे गुणातीताच्या लक्षणासंबंधी व आचाराबद्दल अर्जुनाचा प्रश्न आहे. त्यास देव उत्तर देतात. अर्जुना! गुणातीत हे नाव म्हटले तर खरे व म्हटले तर खोटे असे उभय एकत्र आहेत. असे हे तुझे विचारणे आहे. तुझी ही प्रश्न करण्याची पद्धत अगदी नवलाचीच वाटते ॥ ३२३ ॥

कारण ज्याला 'गुणातीत' असे म्हणतात तो गुणाधीन खास नसतोच. अथवा तो जरी गुणात राहटत आहे, असा दिसत असला तरी तो गुणांच्या सपाट्यात तादात्म्य भ्रांतीस सापडत नाही, हे खास ॥ ३२४ ॥

पण तो गुणातीत या गुणांच्या संबंधात–हालचालीत–वावरत असता गुणांच्या आधीन आहे किंवा गुणांच्या आधीन नाही, हे कसे जाणावे ! ॥ ३२५ ॥

'हा ब्रह्मदेव आहे' असे समजून कोणी स्तुती करो किंवा 'नीच आहे' असे समजून निंदा करो! परंतु राख झाल्यावर जशी तिला जळण्याची अगर विझण्याची भीती राहत नाही त्याप्रमाणे निंदास्तुतीपासून हर्षविषाद उत्पन्न होत नाहीत ॥ ३६० ॥

## अध्याय पंधरावा

आता हे आपले हृदय शुद्ध करून त्या हृदयरूपी चौरंगावरच श्रीगुरुचरणांची स्थापना करू ॥ १ ॥

नंतर ब्रह्मात्मैक्य निश्चयरूपी ओंजळीत सर्वेंद्रियरूपी फुलांच्या कळ्या भरून त्या पुष्पांजलीचे श्रीगुरूस अर्घ्य देऊ ॥ २ ॥

अनन्य भावरूपी स्वच्छ पाण्याने श्रीगुरुचरणांस स्नान घालून त्यांच्याच ठिकाणी असणाऱ्या एकनिष्ठ वासनारूप चंदनाचे श्रीगुरूस अनामिका बोटाने गंध लावू ।। ३ ।।

प्रेमरूपी सोन्याची नूपुरे चांगली घासून, स्वच्छ करून ती श्रीगुरूच्याच सुकुमार पायांस घालू ।। ४ ।।

अव्यभिचारित्वामुळे शुद्ध असलेली श्रीगुरुविषयक एकनिष्ठ प्रेमलक्षणाची जी भरीव आवड तीच सर्वोत्तम दृढ आवडीची जोडवी, श्रीगुरूच्या पायांच्या बोटांमध्ये घालू ।। ५ ।।

आनंदरूपी सुवासाच्या भराने युक्त अशी अष्टसात्त्विक भावरूपी आठ पाकळ्यांचे उमललेले कमळ श्रीगुरुचरणांवर वाहू ।। ६ ।।

तेथे अहं अहं अशा स्वरूपाचा सुगंधी धूप सदा जाळू आणि अनात्मा जीव मी नाही अशा तेजाने ओवाळू आणि श्रीगुरूच्या ब्रह्मभावास ऐक्य पावून त्या ऐक्यभावानेच श्रीगुरूना आलिंगन देऊ ।। ७ ।।

माझे शरीर व प्राण या दोघांच्या दोन पादुका करून श्रीगुरूच्या श्रीचरणांमध्ये घालू व श्रीगुरुचरणांवरून ऐहिक, पारत्रिक भोग व तत्सापेक्ष मोक्ष यांचे निंबलोण ओवाळून टाकू ।। ८ ।।

या श्रीगुरुचरण सेवेने सेवक अशा भाग्यास प्राप्त होतो की, ज्या भाग्याने धर्म व मोक्षासकट सर्व अर्थांची प्राप्ती होऊन सर्वांत सत्ताधारित्वाचे मुख्य पद तो निर्माण करतो ।। ९ ।।

तंतूवाद्यापासून उत्पन्न होऊन, कानाला विषय होऊन ऐकू येणाऱ्या नादाच्या पूर्वीचा जो मूळ नाद म्हणजे ते ब्रह्म आहे. तसेच नाकाला विषय न होणाऱ्या सुगंधाच्या मूळचा जो मकरंद–सुगंध किंवा जो विषय सेवनाशिवाय भोग्य साधन निरपेक्ष असलेला, मूर्तिमंत, सोलीव स्वरूपानंद ब्रह्म आहे ।। ७४ ।।

जे अलीकडे व पलीकडे, पुढे व मागे अशा मर्यादेविना सर्वव्यापक आहे व जे पहाणारावाचून जे पाहणे म्हणजे स्वयंप्रकाश आहे आणि जे अदृश्य–सर्वप्रमाणास अविषय आहे ।। ७५ ।।

ज्या ब्रह्माच्या ठिकाणी मायारूप कल्पित उपाधीचा आध्यासिक संबंध मानिला असता नामरूपादी प्रपंचाचा विस्तार व्यवहार होतो ते ब्रह्म होय ।। ७६ ।।

त्यानंतर जेथे 'इदंता' म्हणजे 'इदं' स्फूरण नाही म्हणजे इदं प्रतीतीचा आत्मा विषय नाही. अतएव इदं स्फूरण सापेक्ष 'अहं' स्फूरणही जेथे नाही अर्थात 'अहं-इदं' अशा उभयविध वृत्तींनी रहित; नित्य उपलब्धी स्वरूप असलेले आपले जे आत्म-स्वरूप ते आपणच आत्मत्वाने पहावे. (त्याचे साक्षात्काररूप ज्ञानसंपादन करून घ्यावे) ॥ २६७ ॥

सहज विचार करून पाहिले तर, ज्या ठिकाणी शब्द मावळतो म्हणून न बोलण्याने ज्याची स्तुती होते. काही न जाणणे (सर्व प्रमाण अविषय आहे असे जाणणे) हेच ज्याचे खरे जाणणे आहे. इतर काहीही (सापेक्षरूप सामान्य विशेष) न होऊनच ज्या वस्तूचे (स्वरूप) होणे आहे. (असा नित्यसिद्ध, दृग्मात्र, उत्तम पुरुष आहे) ॥ ५४१ ॥

शुद्ध उत्तम सोन्यात पूर्णतया मिसळण्याकरिता उत्तम सोनेच पाहिजे. म्हणजे त्याची किंमत व वर्ण एकच असतो. याप्रमाणे मद्रुप झाल्यावरच माझी भक्ती संभवते ॥ ५६७ ॥

याप्रमाणे पंधराव्या अध्यायात सांगावयास आरंभ केल्यापासून येथपर्यंत हा केवळ सर्व शास्त्रांच्या अभ्यासाने प्राप्त होणारा म्हणजे कळणारा असा उपनिषद्रूपी कमळातील गीतारूपी एक सुवासच सर्व जगभर दरवळला आहे ॥ ५७१ ॥

## अध्याय सोळावा

विश्वाच्या आभासास मावळविणारा (बाधित करणारा) व अद्वैत स्थितिरूप कमलिनीचा सर्वांदळी विकास करणारा आश्चर्यकारक श्रीगुरुरूपी चित्सूर्य उदयास आला आहे. त्यास आता वंदन करू ॥ १ ॥

जो श्रीगुरु सूर्य अविद्यारूपी रात्रीचा नाश करून ज्ञान व अज्ञानरूपी चांदण्या नाहीतशा करून टाकतो. ज्ञानी लोकांस आत्मबोधाचा संशय विपर्ययरूपी भ्रमात्मक अभ्ररहित आनंदमय मंगलदिन उजाडवितो ॥ २ ॥

हा सूर्य उगवल्यावर जीवरूपी पक्ष्यांना ब्रह्मात्मैक्य ज्ञानाचे डोळे प्राप्त होऊन देहात्मत्व भ्रमाची घरटी ते सोडून जातात ॥ ३ ॥

श्रीगुरुरूपी सूर्याच्या उदयामुळे वासनात्मक सतरा तत्त्वांच्या लिंगदेहरूपी कमळाच्या पोटात जीवचैतन्यरूपी भ्रमर अज्ञानाने व देहाहंकारामुळे अडकलेला असतो, त्या रूपाने नाश पावणाऱ्या जीव भ्रमराची त्या बंधनापासून मुक्तता होते ॥ ४ ॥

शब्दरूप शास्त्रादिकांच्या दुर्ज्ञेयरूप विसंवादात्मक अडचणींत सापडताच सामान्य-ज्ञान व विशेषरूप अज्ञान या स्वरूपाची सायंकाळ झाल्यामुळे बुद्धी व बोध हेच कोणी

चक्रवाक पक्षी त्या पक्ष्याच्या जोडप्यांची फाटाफूट होऊन ती उभयता जीव आणि ब्रह्म यांच्यातील भेदरूपी नदीच्या दोन्ही तीरांवर विरहाने वेडी होऊन दुःखाने एकमेकांच्या भेटीकरिता ओरडत असतात ।। ५ ।।

बुद्धी आणि बोधरूपी चक्रवाक पक्ष्यांच्या जोडप्याला ऐक्याचे तो समाधान भोगवितो. त्या जोडप्यांना एकत्र मेळवितो. त्या चिदाकाशरूपी भुवनात लावलेला श्रीगुरुरूपी हा जणू एक दीपच आहे ।। ६ ।।

श्रीगुरुरूपी सूर्याच्या उदयाने उजाडलेल्या पहाटेच्या वेळी यच्चयावत भेदाची चोर वेळही कायमचीच संपते. मोक्षमार्गीचे प्रवासी आत्मानुभवाच्या वाटेने निःसंदेहपणे चालावयास लागतात ।। ७ ।।

ज्याच्या आत्मानात्मरूपी किरणांच्या संबंधामुळे ज्ञानरूपी सूर्यकांत मण्यांतून उद्दीपित होऊन निघालेल्या ठिणग्या प्रदीप्त होतात व संसाररूपी अरण्ये जाळून टाकतात ।। ८ ।।

ज्याचा प्रखर झालेला योगात्मक किरणसमुदाय ब्रह्मस्वस्वरूपी उखर–माळ-जमिनीवर स्थिर झाला असता अष्टमहासिद्धिरूपी मृगजळाचा पूर येतो ।। ९ ।।

ते ब्रह्म मी आहे अशा वृत्तिज्ञानात्मक माध्यान्ह काळी केवळ आत्मानुभावरूपी माथ्यावर श्रीगुरुरूपी सूर्य आला असता, देहात्मत्व भ्रांतिरूप छाया, ब्रह्मात्मैक्य बोधरूपी पायाखाली लपून कायमचीच नाहीशी होते ।। १० ।।

त्यावेळी तेथे मायारूपी रात्रच राहात नाही. तर मग द्वैताभासरूपी स्वप्नासह विपरित ज्ञानरूपी निद्रेस कोण बरे सांभाळणार? ।। ११ ।।

म्हणूनच त्या द्वैत आणि त्याचा आभासरूपी भ्रम ही सर्वच त्या अद्वय बोधरूपी नगरात कायमचीच संपतात. महानंदाची विपुलता होऊन आनंदानुभवाची देवघेवही मंद होऊ लागते ।। १२ ।।

फार काय सांगावे ! ! याप्रमाणे मुक्तकैवल्यरूपी उत्तम दिवस त्या देहतादात्म्यरहित ब्रह्मस्थितीस पावलेल्या स्थितप्रज्ञास श्रीगुरु सूर्याच्या तेजामुळे, सदा प्रकाशित होतो ।। १३ ।।

श्रीगुरु सूर्य ब्रह्मात्मैक्यरूपी आकाशाचा राजा आहे जो नित्य बोधाने ज्याचा उदयही सदाच असतो; तथापि भ्रमनिवृत्तीनंतर त्याजवर श्रीगुरुमुखातून होणाऱ्या महावाक्योपदेशाच्या रूपाने त्याजवर पुन्हा उदय झाल्याचा व्यवहार मात्र होतो. तो उदय झाल्याबरोबर पूर्व पश्चिमादी दिशांसह उदय व अस्त या सापेक्ष धर्मांचे अस्तित्वच नाहीसे करतो ।। १४ ।।

न दिसणे व दिसणे या ज्ञानाज्ञानास जो श्रीगुरु सूर्य नाहीसे करतो. अर्थात भरीव ज्ञानरूप ब्रह्म उरते. फार काय सांगावे! या श्रीगुरुरूपी सूर्याच्या उदयाचा प्रकार हा लौकिक प्रातःकालाहून अत्यंत विलक्षण आहे ।। १५ ।।

जो श्रीगुरु सूर्य दिवस आणि रात्र यांच्या पलीकडील म्हणजे ज्ञानाज्ञानातीत म्हणजे केवळ चित्स्वरूप आहे, तो स्वयंप्रकाश आहे. त्यास विषय करून कुणी वरे पाहावे! ।। १६ ।।

जेथे प्रकाश्य पदार्थाविना केवळ चित्प्रकाशाचा सुकाळ आहे त्या श्रीगुरु चित्सूर्य श्रीमन्निवृत्तिनाथांना आता माझा वारंवार नमस्कार असो! असे मी श्रीज्ञानदेव म्हणतो. शब्दास व शब्दाच्या सर्व वृत्तींस अविषय असणाऱ्या श्रीगुरूला शब्दद्वारा केलेली स्तुती ही बाधक होईल म्हणून ती शोभत नाही ।। १७ ।।

शब्दातीत असणाऱ्या श्रीगुरूचे अपूर्वत्व जाणून जेव्हा स्तुती करणारा स्तुतिविषय श्रीगुरु, स्तावक वचने आणि स्तव्यबुद्धी यांसह सर्व त्रिपुटी व त्याचा अभिमान नाहीसा होईल तेव्हाच ती स्तुती श्रीगुरु सूर्याच्या योग्यतेच्या मानाने खरेपणास व उत्तमपणास प्राप्त होईल ।। १८ ।।

ज्यास ज्ञेय म्हणून विषयत्वाने न जाणल्यानेच खरे जाणले होते. जो वाच्यवाचक-भावसंबंधरहित असल्यामुळे सापेक्ष मौनासही मिठी देणे हेच ज्याचे खरे वर्णन करणे होय. आपण विशेष काहीही न होण्यानेच ज्या श्रीगुरूंना आपल्या स्वस्वरूपाचे ठिकाणी आणता येते मग त्यांची आत्मत्वाने प्राप्ती होते ।। १९ ।।

त्या तुझ्या स्तुती व ज्ञानाच्या उद्देशाने परेसह पश्यंती मध्यमा वाणीस पोटात घालून वैखरी वाणी ही कायमचीच विलयास पावते ।। २० ।।

आपण वाणीला अविषय आहात. त्या आपणास मी सेवकपणाच्या नात्याने शब्दाच्या स्तुतीचे अलंकार घालीत आहे. तरी हे अद्वयानंदरूपी श्रीगुरो, तो माझा एक अपराधच आहे. तो आपण सहन करावा ।। २१ ।।

गीता या नावाने सुप्रसिद्ध तुमचे मधुर असे प्रसादामृतच आहे. गीतेचे व्याख्यान करू शकलो हे तुमच्या माझ्या सुदैवाला दुप्पट सौभाग्य लाभले आहे. म्हणजे ही माझ्या परमभाग्याची गोष्ट घडली आहे ।। २१ ।।

ज्ञान जेव्हा कामाच्या–भोगाच्या (आसक्तीच्या) मोहाने तदाकार होते तेव्हा ते तामस ज्ञान होते. ते तामस ज्ञान रागद्वेषांना आश्रय देऊन आसुरी संपत्ती निर्माण करते. त्या घोर आसुरी संपत्तीचेही आम्ही पुढे व्याख्यान करणार आहोत ।। ६० ।।

ज्याप्रमाणे तहानेल्याची तहान हरण करण्यास पाणी जसे नेहमी तत्पर असते त्याप्रमाणे दयावंत असे दैवीसंपत्तीचे पुरुष दुःखितांचे दुःख हरण करण्यास आपले जीवित सार्थक झाले असे मानतात ।। १६१ ।।

ते पुरुष हे अर्जुना ! मूर्तिमंत दयेचे अवतारच असतात. अशा दैवी पुरुषांचा प्रादुर्भाव होताच मी देवच त्याचा ऋणी म्हणून सेवा करतो ।। १६२ ।।

## अध्याय सतरावा

तुझी ब्रह्मात्मैक्य योगरूप सर्वोत्कृष्ट योगनिद्रा आहे ती मुमुक्षूस लाभते तेव्हा ती विश्वात्मक स्वरूपाने विकसित, प्रफुल्लित झालेल्या आकारास विक्षेप मुद्रेस बाधित करते, विश्वविकसित मुद्रा ब्रह्मात्मैक्य योगरूपी अद्वय निद्रेने बोधस्थितीने मावळविणाऱ्या, हे गणेशस्वरूप श्रीगुरुराया, तुला नमस्कार असो ।। १ ।।

सत्त्व, रज, तम या त्रिगुणात्मक त्रिपुरांनी वेढलेला व जीवत्वरूपी संकटात सापडलेला जो आत्मरूपी श्रीशंकर आहे त्याने श्रीगुरुरूपी गणपतीचे स्मरण करून देहादी बंधनांतून, जीवदशेतून सोडविले ।। २ ।।

म्हणून श्रीशंकराबरोबर हे श्रीगुरो ! तुमची तुलना करून पाहिली असता तू आपल्या गुरुत्वामुळे अधिक वजनदार आहेस. असे असूनही आपण मायारूप जलातून जीवास तारून नेण्याविषयी हलकेही आहात ।। ३ ।।

तुमच्या यथार्थ ब्रह्मस्वरूपाविषयी जे अज्ञानी आहेत त्यांचेसाठी तुम्ही वक्रतुंड असल्याचे दिसता. जे तुमचे यथार्थ स्वरूप जाणतात त्या ज्ञान्यांकरिता नित्य सरळ सन्मुखच आहात ।। ४ ।।

हे गणेशस्वरूप श्रीगुरुराया, आपली सूक्ष्म दृष्टी पाहिली असता ती परमार्थात अत्यंत निर्विशेष अशी आहे. तरीही त्यांच्या उघडझापीने आपण जगताचे उत्पत्ती व नाश दोन्ही लीलेने करता ।। ५ ।।

हे श्रीगुरो ! आपल्या प्रवृत्तिरूप कानाच्या हालविण्याने संसाररूपी हत्तीच्या गंडस्थळातून वाहणाऱ्या वैषयिक सुखात्मक मदस्रावाच्या सुगंधाने युक्त असा वायू सुटून त्यात लुब्ध झालेल्या जीवरूपी भ्रमराच्या नीलकमलांनी जणू तुमची पूजाच केली आहे. असे तुमचे गंडस्थळ शोभते ।। ६ ।।

नंतर निवृत्तिरूप दुसऱ्या कानाच्या हालविण्याने अंतर्मुखवृत्ती होऊन तुमची जीवभ्रमराच्या नीलकमलांनी बांधलेली ती पूजा उधळून जाते. तेव्हा आपण आपल्या मोकळ्या अंगाच्या लेण्यानेच प्रवृत्ति-निवृत्तिलक्षणरूप धर्म मिरविले जाता ।। ७ ।।

आपल्या डाव्या मांडीवर वसलेल्या मायाशक्तीची नृत्यक्रीडा म्हणजेच हा जगतरूपी प्रत्यक्ष भासणारा नामरूपात्मक विश्वाभास आहे व तोच जगतरूपी आभास आपल्या तांडवनृत्याच्या निमित्ताने अभिव्यक्त करून त्यात भासणाऱ्या आपल्या सच्चिदानंद प्रतीतिस्वरूपाने; जगत व्यवहार चालवून एक कौशल्यच दाखवीत आहात ।। ८ ।।

हे असो, हे श्रीगुरो ! आपण ज्यांचे सोयरे होता तो सोयरीकीच्या व्यवहारासच मुकतो व आपल्या अद्वयानंद स्वरूपास मिळतो हा मोठा नवलाव आहे ! ! ।। ९ ।।

तुम्ही जीवाचे अज्ञान वा अज्ञानकार्य बंध यांचा ठावठिकाणाही नाहीसा करता. म्हणून आपण जगतबंधू आहात. हेही उचितच आहे. असा अभिप्राय धरून जे मोठ्या आनंदाने आपला आश्रय धारण करण्यास आत्मभावाने शरण येतात त्यामुळे जगतबंधू हे नाव सार्थ ठरते ।। १० ।।

जे तुला श्रीगुरुदेव या भावाने शरण येतात त्यांचा द्वैतपणाच्या नावाने देहसुद्धा वेगळा शिल्लक राहू देत नाहीस. कारण हे देवराया, त्या दुसऱ्यास तू अद्वय स्वस्वरूपच करतोस आणि देहरहित ब्रह्मस्थितीकालात सर्वांचा अभाव करून अद्वय एकच एक ब्रह्म उरवितोस ।। ११ ।।

या उलट तुला जे पुढे करून म्हणजे 'ज्ञानाचा विषय आहेस' असे समजून, तुला परिच्छिन्न समजून, साधनद्वारा तुझी प्राप्ती करून घेण्याकरिता अनंत साधनांच्या धावा करीत सुटतात. त्यांना तू अज्ञात व अप्राप्तवत राहतोस ।। १२ ।।

जे ध्यान करण्याच्या निमित्ताने मनात आणू पहातात त्याच्याकरिता तू त्यांच्या ध्यानात सीमित विषय होऊन सापडत नाहीस. इतकेच नव्हे तर जे तुझ्या सर्वव्यापक ज्ञानाने तुझे ध्यान करण्याचेही विसरतात, त्यांचेवर आपली अतिप्रीती असते ।। १३ ।।

जे तुला नित्य, स्वत:सिद्ध अशा रूपाने जाणत नाहीत ते विद्वान या जगात सर्वज्ञत्वादी नावाने वावरत असले व साधनद्वारा वाङमय चातुर्यद्वारा वेदाएवढे अर्थभरित बोलणे करीत असले तरीही तू शब्दादिकास अविषय राहतोस ।। १४ ।।

मौन हेंच तुझे जन्मराशीवरून काढलेले नाव आहे. त्यामुळे तुझी स्तुती करण्याची उत्कट इच्छा मी कशी करावी हे सर्व दृश्यमान जगत भासत आहे. ती सर्व आपली माया आहे, तर मग मी तुझे भजन तरी करावे कसे ? ।। १५ ।।

देवा ! मी आपला सेवक होऊन पाहीन तर आपल्या अखंड अद्वय स्वरूपात सेव्य-सेवक भावामुळे द्वैत निर्माण करीत असल्यामुळे, माझ्या पदरात आपला द्रोहच येईल. म्हणून, महाराज ! आपल्या संबंधाने आता सेवक, भजन इत्यादी काहीही विशेष होणार नाही ।। १६ ।।

ज्या वेळी सर्व साधनांच्या द्वारा व अनात्म्यांपैकी किंवा सेवकभक्त इत्यादींपैकी मी कोणीही नाही असे निश्चित व्हावे, त्या वेळीच आपल्या अद्वय स्वरूपाची ओळख होईल. हे आराध्य देवता ! वंदनीय देवा ! श्रीगुरुराया ! ! हे तुमचे वर्म मी जाणतो ।। १७ ।।

मीठ ज्याप्रमाणे पाण्यापासून वेगळे उरू न देता पाण्यात ऐक्यास पावते. त्याप्रमाणे माझे ऐक्यबोधालेच नमन आहे असे समजा. यापेक्षा अधिक विशेष काय बोलावे ? ।। १८ ।।

आता असे पहा की, रिकाम्या घागरीने समुद्रात प्रवेश केला असता, ती जशी पाण्याने उचंबळून भरून वर निघते किंवा दिव्याच्या संसर्गाने वातही जशी दीपस्वरूपच होते ।। १९ ।।

त्याप्रमाणे हे श्रीगुरो ! हे श्रीनिवृत्तिनाथा ! तुम्हांला ऐक्यरूपाने नमस्कार केल्याने मी परिपूर्ण ब्रह्म कृतकृत्य झालो आहे. आता तो गीतेचा अर्थच व्याख्यानात आणून प्रकट करीन ।। २० ।।

राजा श्राद्धास आला म्हणजे व्यावहारिक फायदा सहज होतो. लोकांना वाटते याचा मोठा वशिला आहे. जगात कीर्ती होते व श्राद्धही पार पडते ।। १८५ ।।

ब्रह्म हे बोलाच्या पलीकडचे आहे. तो त्याचा अबोला फिटावा म्हणून त्याला श्रुतींनी (आपले वडील, हितकर्ते, मायबाप जे वेद त्यांनी) मोठ्या करुणेने ॐ हे सांकेतिक नाम ठेविले आहे. त्या नावाने ब्रह्मास हाक मारली म्हणजे ते 'ओ' म्हणून प्रतिसाद देते व जीवास अद्वैतत्वाने भेटते ।। ३३२ ।।

## अध्याय अठरावा

हे श्रीगुरो ! आपण स्वयंप्रकाश व अविद्यादिमलरहित आहात. आपल्या भक्तांना सर्वतोपरी मंगलकारक आहात. जन्म व वार्धक्यरूपी मेघ समुदायाचा विनाश करण्याचे बाबतीत आपण प्रबल आहात, त्या आपला जयजयकार असो ।। १ ।।

देवा ! आपण बलवानांतील बल आहात. अज्ञान व ततकार्य अहंकार, त्रिविध दुःख इत्यादी अमंगळ कुळाचा समूळ नाश करण्यात प्रबल आहात. वेद व शास्त्ररूपी वृक्षाचे आपण फल आहात व प्राणिकर्माचे फलदातेही आपणच आहात अशा आपला जयजयकार असो ।। २ ।।

देवा ! आपण स्वरूपतः संपूर्ण वा स्वस्वरूप आहात. ज्यांची विषयवासना निवृत्त झाली आहे अशा वैराग्यसंपन्नावर प्रेमाने कृपा करणारे आहात. सर्वनाशक कालाच्या

क्रीडेस आपण आपल्या आज्ञेने अंकित ठेविले आहे. परमार्थतः अंशरहित परिपूर्ण आहात. हे श्रीगुरुदेवा ! आपला जयजयकार असो ।। ३ ।।

हे श्रीगुरुदेवा ! आपण चिरस्थिर आहात. शिष्याच्या चंचल चित्ताचे प्राशन करून दोंद पुष्ट झालेले आहात. वरचेवर जगदोत्पत्तिरूपी अखंड क्रीडा करणे हीच ज्यांना सदा प्रिय आहे, अशा तुमचा जयजयकार असो ।। ४ ।।

देवा ! आपले स्वरूप परमार्थतः अंश व अवयवरहित आहे. नित्य निरतिशय व स्वयंप्रकाशरूपाने स्फुरित होणारा तुमचे ठिकाणी विपुल आहे. त्या स्वरूपाचे ठिकाणी पंचक्लेश, त्रिविधदुःख, कामकर्म, अविद्या हे सर्व मल मुळीच नाहीत. संसार-वृक्षास मूलभूत आधार व अधिष्ठान असणाऱ्या श्रीगुरुदेवा आपला जयजयकार असो ।। ५ ।।

हे देवा ! तू स्वतः स्वयंप्रकाश आहेस. जगतरूपी मेघाचा गर्भ राहण्याचे आकाश, जगदोत्पत्तीच्या आरंभाचा आधारस्तंभ व संसाराचा बाध करणारा आहेस. अशा देवा ! तुझा जयजयकार असो ।। ६ ।।

हे देवा ! तू अत्यंत शुद्ध आहेस. अविद्यारूपी वनाचा विनाश करणारा हत्ती आहेस आणि शमदमादी साधनद्वारा मदनाच्या गर्वाचा भेद करणारा आहेस अशा दयासागर देवा ! तुझा जयजयकार असो ।। ७ ।।

देवा ! तू स्वगतादी सर्व भेदरहित एकरूप आहेस, मदनरूपी सर्पाचा गर्व हरण करणारा आहेस. भक्तांच्या भावनापूर्ण हृदयरूपी घरांतील तू दीप आहेस. आणि त्रिविध तापाचा विनाश करणारा आहेस. देवा ! तुझा जयजयकार असो ।। ८ ।।

देवा ! तुझ्यासारखा पारमार्थिक सत्तावान पदार्थ नाही. अशा अद्वितीया शुद्ध विवेक वैराग्यवान अधिकारी पुरुषांना आवडणारा व त्यांचेवर प्रेम करणारा आहेस. देवा ! आपल्या भक्ताच्या अधीन आहेस. भजन भक्तीस योग्य आहेस. मायेस आच्छादन करण्यास अशक्य असणाऱ्या मायेच्या अतीव आहेस. तुझा जयजयकार असो ।। ९ ।।

हे श्रीगुरुदेवा ! निर्विकल्प ब्रह्मवस्तूची प्राप्ती करून देणारा तू कल्पतरूच आहेस. तसेच आत्मज्ञानरूपी वृक्षाच्या बीजाचे उत्पत्तिस्थान आहेस. ज्ञानाच्या वाढीस आश्रयभूत भूमी तू आहेस. श्रीगुरुदेवा ! तुझा जयजयकार असो ।। १० ।।

तसे, हे श्रीगुरुराया ! तशीच माझी स्थिती तुम्ही केली. याशिवाय आपण माझा मीपणा नाहीसा करून स्तुतीच्या निमित्ताने माझ्या वाचेला वेड लावले ।। १८ ।।

श्रीव्यास हे स्वभावतःच श्रेष्ठ कारागीर, सूत्रकार विशाल बुद्धीचे होते. त्यांनी मोठ्या कुशलतेने (ब्रह्मसूत्रे रचिली आणि) वेदरूपी रत्नांच्या पर्वतावर उपनिषदार्थ पठारावर खणावयास प्रारंभ केला ।। ३५ ।।

त्या वेळी त्या माळ जमिनीत धर्म, अर्थ व काम हा त्रिविध पुरुषार्थरूपी भिन्न भिन्न आकाराचे पुष्कळ गडगळ, गोटे, बारीक चुरा निघाला. त्या धोंड्यांचा महाभारतरूपी तट गीतारूपी देवालयाचे भोवती बांधला ।। ३६ ।।

मग निवृत्तिरूपी ओळंबा लावून आखणी करून व सर्व शास्त्रांची पुरणी घालून मोक्ष मर्यादेच्या मांडणीचा (आकार) साधला ।। ३८ ।।

पण तो कर्मठ दीन बिचारा अज्ञानामुळे अंध झालेला असल्यामुळे सर्व जगतात ओतप्रोत भरलेल्या एवढ्या व्यापक ईश्वरासच जाणत नाही; असा ईश्वर प्रत्यक्ष त्याच्यापुढे असूनही जर त्यास दिसत नाही तर मग त्यास ब्रह्मनाम व त्या नामावरील श्रद्धेचे वर्म इत्यादी गोष्टी तरी कशा कळणार ? ।। ६३ ।।

त्याग करण्याचे युक्तिपूर्ण वर्म चुकले असता जो कर्मत्याग केला जातो त्या त्यागाचेही मनुष्यास ओझे होते. कर्मबंधांत सापडतो. मात्र सर्वत्र वैराग्यसंपन्न जे आहेत ते केव्हाही त्याज्य गोष्टीचे (निषिद्ध कर्माचे) आचरण करण्याकडे वळतही नाहीत ।। १३४ ।।

भूक लागलेल्या मनुष्यापुढे ठेवलेले अती कढत अन्न, मग ते वाटेल तितके ऊन असले तरी बुद्धीने विचार न करता, अविचाराने ते लाथेने झुगारून दिले तर त्याला लंघनच करावे लागणार ! ।। १८१ ।।

एवढे मोठे आकाश सर्वत्र असूनही जसे ते कोणीकडेच दिसत नाही तसा बुद्ध्यादिकांपुढा (वृत्तिज्ञानाचे पुढे) जगाचा एवढा मोठा मिथ्याभास आहे, पण त्यास तो कोणीकडेही दिसत नाही ।। २११ ।।

बाहेर सोडण्याचा प्राणवायूच योगाभ्यासाने दाबून धरला असता तोच त्याहून उलट लक्षणाच्या कुंभकास कारणीभूत होतो. त्याप्रमाणे सत्य व असत्य यांचे मिश्रण झाले म्हणजे ते त्या दोहोंनाही जिंकण्यास कारणीभूत असणारे तिसरेच निर्माण होते ।। २४६ ।।

ज्या ज्ञानाने भूतमात्राच्या औपाधिक अनेकत्वामुळे आपण आपल्या वेगळ्या ठिकऱ्या करून घेतल्या आहेत व ज्याने ज्ञात्याला चुकवून फारच भ्रमिष्टपणा आणला आहे ।। ५३९ ।।

त्याप्रमाणे जे ज्ञान आत्मज्ञानाच्या मंदिराच्या आवाराच्या बाहेर भोवतालून मिथ्या मायेच्या माळरानावर पसारा घालून जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्थांचे खेळ दाखवून जीवांस फसविते ॥ ५४१ ॥

अर्जुना ! जे ज्ञान आपल्या पोटात साध्य, साधक व साधन ही त्रिपुटी किंवा जागृती आदी तीन अवस्था नाहीशा करते अशा त्या ज्ञानालाही नाहीसे करणारी जी परब्रह्मरूपवस्तू ॥ १००४ ॥

कुळस्त्री जशी सासर व माहेर या दोन्ही कुळांचा अभिमान टाकून केवळ आपल्या प्रिय पतीलाच अनुसरते तशी बुद्धी ही द्वैतभावना सोडून केवळ आत्मचिंतनातच रत होते ॥ १०१३ ॥

मग विषयापासून परावृत्त झालेली इंद्रिये प्रत्यगात्म्याकडे लावून आत्माकार वृत्तिरूप गंगेच्या तीरावर आणिली व त्यांच्याकडून उत्तमचित्त शोधक प्रायश्चित्तेही करविली ॥ १०१७ ॥

अर्जुना ! गुद व शिश्न या दोन द्वारांच्या मध्यभागी जी शिवण आहे तिचा मध्य पायाच्या टाचेने दाबून प्रथम मूळबंध करतो ॥ १०३६ ॥

अधोभाग अकुंचन करून मूळ, ओढियाणा व जालंधर असे तीन बंध देऊन आणि प्राणापानादी वायूचे भेद मोडून त्यांना एकत्रित करून ॥ १०३७ ॥

अर्थात अशा प्रकारे प्राणनिरोधपूर्वक कुंडलिनी जागे करून सुषुम्ना नाडीचा मार्ग विकसित करून आणि आधारचक्रांपासून तो आज्ञाचक्रांपर्यंत सर्व चक्रांचे भेदन करून ऊर्ध्व जातो ॥ १०३८ ॥

मग ब्रह्मरंध्रातील सहस्रदल कमलरूपी मेघापासून चांगलीच अमृतवृष्टी होऊन त्याचा तो ओघ सुषुम्ना नाडीने मूलाधारचक्रापर्यंत खाली आणून ॥ १०३९ ॥

मग आज्ञाचक्ररूपी कैलास पर्वतावर नाचत फिरत असलेल्या चैतन्यरूपी भैरवाच्या भिक्षापात्रात मन व प्राण ह्यांची जणू खिचडी वाढून ॥ १०४० ॥

अशा प्रकारे हा योग साधनांचा बळकट मेळावा पुढे करून म्हणजे दृढ योगाभ्यासाचे साह्य घेऊन त्याचे मागील बाजूस पोषक, उपयुक्त ध्यान निश्चित सिद्ध करतो ॥ १०४१ ॥

(वैराग्य) आणखी ध्यान व योग ही दोन्ही निर्विघ्नपणे आत्मज्ञानाच्या ठिकाणी प्राप्त होण्यासाठी त्या अगोदरच त्यांनी ॥ १०४२ ॥

तेव्हा यथार्थ ब्रह्मात्मैक्यज्ञान हेच कोणी एक सार्वभौम राज्य साधकाला अर्पण करून ते सद्‌गुण आपण स्वतः त्याचे परिवार होऊन राहतात ॥ १०६८ ॥

प्रवृत्तिरूपी राजमार्गाने त्याची स्वारी चालली असता निरनिराळ्या तीन अवस्थारूपी तरुण स्त्रिया येऊन त्याच्यावरून पदोपदी आपापल्या सुखाचे लिंबलोण उतरून टाकीत आहेत ॥ १०६९ ॥

त्या सार्वभौम राजाच्या पुढे विवेकरूपी चोपदार हा बोधरूप सोन्याचा दंड हातात घेऊन तद्वारा दृश्यपदार्थांची गर्दी दूर करीत चालतो आणि योग भूमिका या जणू काय हातात आरत्याच घेऊन त्यास ओवाळण्यास येतात ॥ १०७० ॥

तेव्हा त्या प्रसंगी ऋद्धिसिद्धींचे अनेक समुदाय येतात व त्यांनी केलेल्या पुष्पवृष्टीच्या योगाने तो स्वतः जणू नाहातच असतो ॥ १०७१ ॥

दृश्यपदार्थरूपी पाण्याच्या सरोवरात (शब्दादी पंच) विषयरूपी कमले प्रफुल्लित–विकसित–झाली असता पंचज्ञानेंद्रिये, सहावे मन यांसह हे सहा पाय ज्यास आहेत, अशा जीवरूपी भ्रमराकडून त्या विषयात्मक कमलमकरंदाचे सेवन तो ईश्वररूपी सूर्य करवितो ॥ १३०१ ॥

म्हणून हे कृपानिधे ! तुमच्या औदार्याला सीमा नाही. परंतु त्यास मी एक म्हणावयास निमित्तमात्र झालो नाही का ? देवा ! तुमच्या या (ज्ञान) दानात प्राप्ती (आत्मलाभ) होणारी आहे, असे मला वाटते ॥ १३७८ ॥

# श्रीज्ञानेश्वरीतील कठीण शब्दांचे अर्थ



| अध्याय | ओवी | शब्द | अर्थ |
|---|---|---|---|
| | | **अ** | |
| ९ | (२७६) | अउमकारेंसीं | अकार, उकार व मकार या ॐकाराच्या तीन मात्रांसह |
| १८ | (७२२) | अकरणीय | निषिद्ध, अकर्तव्यरूप |
| १८ | (१०) | अकल्पनाख्यकल्पतरु | कल्पनारहित परमात्म स्वरूपास देणारा कल्पवृक्ष |
| १८ | (४९२) | अंकसळा | धातूला कसोटी लावून तिची परीक्षा करणारा |
| १७ | (३९५) | अखरे | खोटे |
| १७ | (२१६) | अंगतुक | शरीराचा आकार व वजन |
| ९ | (३९१) | अगरू | चंदनविशेष |
| ११ | (२५७) | अंगलग | आश्रय |
| १५ | (९९) | अंगवसा | ढगळा, शेंडा |
| १७ | (२४६) | अंगहीन | हीन अंगना किंवा पण्यांगना |
| ९ | (४८४) | अंगानिळ | अंगावरून येणारा वारा |
| ८ | (९४) | अग्निस्थान | योगशास्त्रात सांगितलेले भ्रुकुटीमधील द्विदल चक्र, मूलाधार. |
| ९ | (४७५) | अग्रहार | इनाम दिलेली जमीन |
| ३ | (१२३) | अघ | पाप |
| ११ | (७०८) | अंघ्रि | पाय, चरण |
| २ | (२३२) | अचुंबित | अस्पृष्ट |
| १८ | (११९४) | अच्युत | आपल्या स्थानापासून भ्रष्ट न होणारा |
| ४ | (४४) | अज | जन्मरहित |
| १३ | (२२८) | अजंगम | झाड |
| १८ | (११९३) | अजर | जरारहित |
| ३ | (१४२) | अजा | शेळी |
| १३ | (२२९) | अजातशत्रु | ज्याला कोणीच शत्रू नाही असा |
| ७ | (१७३) | अटवी | अरण्य |
| ६ | (७७) | अटुवे | संकोचित |
| १७ | (३४१) | अढंच | थोर, समर्थ |
| १५ | (१९१) | अणगट | अंकुर |
| ६ | (२९७) | अणिमादिक | अणिमा, महिमा, लघिमा, गरिमा, प्राप्ती, प्राकाम्य, ईशित्व, वशित्व या आठ सिद्धी. |
| १८ | (११९७) | अणु | सूक्ष्म |
| १८ | (३६) | अणुआर | चाराचुरा |
| १ | (१५०) | अंतक | यम |
| ६ | (२५४) | अंतर्ज्योति | प्रत्यग्आत्माज्योती |
| १३ | (५१८) | अतिकार्श्य | अतिशय रोडपणा |

| अध्याय | ओवी | शब्द | अर्थ |
|---|---|---|---|
| | | **अ** | |
| १८ | (८) | अतिक्रुतकंदर्पसर्पदर्प | कामरूपी सापाचा गर्व अपमानित, नाहीसा करणारा |
| ५ | (२) | अतिरस | अतिशयपणा, आग्रह |
| ७ | (१६१) | अतीतली | होऊन गेलेली |
| १ | (२२०) | अंतुरी | अंत:पुरातील स्त्री |
| १४ | (२९९) | अर्थपंथे | विवेकरूपी अर्थाच्या मार्गाने |
| १३ | (२०३) | अदंभित्व | ढोंगीपणाचा अभाव |
| १३ | (९५०) | अदळपण | असमर्थता |
| १७ | (३३२) | अद्वैतत्त्वे | आत्मत्वाने |
| १६ | (१) | अद्वयाब्जिनिविकाश | अद्वैत स्थितिरूपी कमलिनीचा विकास करणारा |
| १३ | (१) | अधिकरण | आश्रयस्थान |
| ९ | (१०६) | अधिष्ठी | अंगीकार करतो |
| ३ | (१३८) | अध्वर | यज्ञ |
| १ | (२२६) | अनकळित | संपूर्ण, निवर, प्रयासरहित, अडचणींत न पडता |
| ११ | (२२५) | अनंग | मदन, अंगहीन |
| ८ | (१२१) | अनघड | आपापली कामे करण्यास असमर्थ अशी स्थिती |
| १८ | (३३३) | अनपायिनी | नित्य, अविनाशी |
| १२ | (१) | अनवरत | अखंड |
| ९ | (१६२) | अनावरण | वस्त्रात गुंडाळता न येण्यासारखा |
| १४ | (४०६) | अनावृत | निरावरण |
| १५ | (४९५) | अनुकरणें | सारखे होणे, तादात्म्य पावणे |
| ५ | (१३८) | अनुकार | प्रतिबिंब |
| ६ | (२७४) | अनुहत | प्राणवायूच्या आघाताशिवाय उत्पन्न होणारा आवाज |
| १४ | (११३) | अनुवृत्ति | अनुक्रम |
| ४ | (३०) | अनुसंग | निकट संबंध |
| ५ | (१६५) | अनुसार | अनुसरणीय मार्ग |
| २ | (१५३) | अनुस्यूत | अखंड |
| १ | (६४) | अपत्य | मूल |
| ६ | (१५८) | अपवर्ग | मोक्ष |
| १३ | (५६९) | अपवाड | असामर्थ्य |
| १८ | (८) | अपह | विनाश करणारा |
| ९ | (१५८) | अपाणि | हस्तरहित |
| १३ | (१०७५) | अपांपति | समुद्र, जलस्वामी |
| ४ | (१२७) | अपावृत्त | प्रकट, उद्घटित |
| १६ | (१५३) | अपैशून्य | इतरांचा दोष काढून टाकून त्यास सद्गुणसंपन्न करणे, गुणग्राहक दृष्टी. |
| १८ | (१४३८) | अप्रमाद | अनवधान न करता |
| १ | (६) | अंबर | वस्त्र, आकाश |
| १५ | (२८४) | अंबु | पाणी |
| १८ | (६) | अंबुद | ढग |
| १५ | (३) | अबोट | अनामिका |
| १५ | (१६७) | अभिचार | जारणमारण |

| अध्याय | ओवी | शब्द | अर्थ |
|---|---|---|---|
| | | **अ** | |
| २ | (२००) | अभिभवणें | पराभूत करणे |
| १६ | (९९) | अभिज्ञ | परिपूर्ण माहितगार, पूर्ण जाणकार |
| ५ | (१६६) | अभोळ | दुर्बल, अनधिकारी |
| १३ | (६६०) | अभ्यर्चणें | पूजा करणे |
| १२ | (१६८) | अमर्ष | क्रोध |
| ९ | (१४२) | अमानुष | मनुष्यदेहधर्मरहित |
| ६ | (१८२) | अमोडी | न मोडलेले, साग्र |
| ४ | (१३१) | अरणी | घासून अग्नी उत्पन्न करण्याचे यज्ञातील लाकूड |
| १८ | (१७९८) | अरव | बन, राई |
| १० | (१) | अरविंद | कमल |
| २ | (२७४) | अरुता | कमी प्रतीचा, अलीकडचा |
| १८ | (१४२) | अरुवार | सुंदर, मृदु |
| २ | (२५३) | अर्जणें | मिळविणे |
| ३ | (१९५) | अर्थवाद | अतिशयोक्तिपूर्ण बोलणे |
| १४ | (२९९) | अर्थपंथे | विचाररूपी अर्थाच्या मार्गाने |
| ९ | (२७०) | अर्धनारीनटेश्वर | आपल्या अर्ध्या अंगाने पार्वतीस दाखविणारी शंकराची मूर्ती. |
| ८ | (११५) | अर्ध बिंब | ॐकाराची अर्धबिंबाकृती अर्धमात्रा |
| १० | (२४४) | अर्यमा | पितरांतील मुख्य पितृदेव |
| १० | (२१५) | अलक | केस |
| ११ | (२४९) | अलिकुले | भ्रमरांचे समुदाय |
| १६ | (२२७) | अल्पक | दरिद्री पुरुष, क्षुद्र बुद्धीचा |
| १५ | (३०३) | अवखळा | न्यूनता, अपूर्णत्व |
| ११ | (८४) | अवगणीया | सोंग |
| १ | (२६) | अवगाहन | स्नान |
| ३ | (५७) | अवबोध | जागृती |
| ४ | (१३८) | अवभृथ | यज्ञसमाप्तीचे शेवटचे स्नान |
| १३ | (२९) | अंवस | अमावास्या |
| १८ | (१४७६) | अविरजी | न विरजलेले |
| ११ | (२५८) | अविसाळ | घरटे |
| १० | (१२९) | अव्यंगवाणे | अनित्यत्व, सातिशयत्वादी दोषरहित |
| १८ | (७१९) | अव्हांटा | आडमार्ग |
| १३ | (७७१) | अव्हांसव्हां | हवे तसे, स्वैररूपाने |
| १८ | (१०२६) | अशन | भोजन |
| ९ | (४२२) | अष्टांग | यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधी ही योगाची आठ अंगे. |
| १० | (३२२) | असकें | पूर्ण, सर्व |
| ४ | (१७७) | असंगडे | विसदृश, विलक्षण |
| १३ | (३१) | असंभड | अमोज, अमाप |
| ८ | (२४) | असमसहास | असंख्यात, असीम |
| १५ | (३०४) | असांगडे | निरुपम, अवर्णनीय |

| अध्याय | ओवी | शब्द | अर्थ |
|---|---|---|---|
| | | **अ** | |
| १७ | (१८७) | असिका-असिकें | संपूर्ण |
| १६ | (३७३) | असितपत्रतरुवर | तरवारीच्या धारेप्रमाणे तीक्ष्ण पानांची झाडे |
| ९ | (१७३) | असिवार | घोडेस्वार |
| १८ | (१८९) | असुरवाड | क्लेश, कष्ट |
| १५ | (७४) | असौरभ्य | सुवास घेता येण्यास अशक्य |
| ९ | (५१५) | अहाकटा | अरेरे ! कीवेचा उद्‌गार ! |
| ११ | (३५१) | अहाळ बाहळी | भयाग्नीमुळे भाजून गेलेली |
| १३ | (२८०) | अक्षम | असमर्थ |
| | | **आ** | |
| १२ | (२०५) | आकांक्षिती | इच्छितात |
| २ | (१) | आकुल | व्याप्त झालेला |
| १३ | (९३८) | आंख | आकडयांचा मेळ, बेरीज |
| ६ | (३१६) | आखर | अक्षर |
| १३ | (८४७) | आखेलेखें | आकडे मांडून, अक्षर वर्णादी लिहून |
| १५ | (१०३) | आंगवसा | आंगी असलेली आवरणे |
| १५ | (९२) | आगारा | अंकुर |
| १३ | (४५) | आघाट | हद्द, सीमा, भाग, फाटे |
| १३ | (३७१) | आचार्योपपास्ती | श्रीगुरुसेवा |
| ९ | (२६७) | आज्य | हवन करण्याचे तूप |
| ५ | (१३२) | आंठी | दृढ आलिंगन |
| १५ | (८८) | आठुळणें | बांधणे, पुष्ट होणे |
| १८ | (३६) | आडऊ | ओबडधोबड दगडाचे डबर |
| ६ | (५५) | आडकंठ | अवघड कडा |
| ११ | (४७८) | आडखिळा | निशाण, लगोऱ्याची रचना |
| ११ | (६०३) | आडणी | मर्यादा |
| १५ | (१५०) | आडफुटणें | मध्येच आडवे फुटणे |
| ६ | (४) | आडमुठी | मिळण्याचा संभव नसता, अनायासे, असीम |
| १६ | (२०३) | आडवंगी | अडथळा, आडकाठी |
| १३ | (६३४) | आडस | खोळंबा, अडथळा |
| १३ | (७००) | आडें | उंबरा |
| १५ | (३८२) | आणियाळें | तीक्ष्ण, अणकुचीदार |
| १६ | (७२) | आते | बनते, होते |
| १६ | (४४५) | आत्मचोर | आत्मघातकी |
| १ | (५४) | आदिवंद्य | पहिल्यांदा वंद्य, वंदनीय |
| ११ | (६०६) | आधलें | उत्सुक |
| १३ | (२३) | आधाधिला | भ्यालेला |
| ६ | (१९३) | आधारद्रुम | आधारचक्ररूपी वृक्ष |
| ६ | (२८९) | आधारू | निरोध, निग्रह |
| १८ | (१००५) | आनंदकणुही | आनंदाचा कणही |

| अध्याय | ओवी | शब्द | अर्थ |
|---|---|---|---|
| | | **आ** | |
| १५ | (३६८) | आपंगणें | आश्रय करणे, संपादन करणे |
| २ | (१३९) | आपजणें | वाटणे, उत्पन्न होणे |
| १३ | (५६६) | आपदा | आपत्ती, दुर्दशा |
| ९ | (५२७) | आपादकंचुकित | पायापासून मस्तकापर्यंत अंगरखा घातल्यासारखे |
| ३ | (५१) | आपादणें | स्वीकार करणे, प्रयत्न करून मिळविणे |
| १७ | (३८) | आपादन | संपादन |
| ११ | (६६५) | आपांपरी | दुर्दशा, अव्यवस्था |
| १ | (२५६) | आप्लविणें | बुडविणे |
| १७ | (२८०) | आफळणें | हापटणे |
| ११ | (३४२) | आंबुखणें | पेटविणे, प्रदीप्त करणे |
| १८ | (७०९) | आंबुखा | शिंतोडा |
| १३ | (७२३) | आंबुथणें | वाढणे, उजळणे |
| १३ | (९७९) | आंबुला | नवरा, पुरुष |
| ९ | (४२१) | आभिजात्य | जन्मतःच कुलीन, उत्तम कुलवान |
| १८ | (२४३) | आम्नाय | वेद |
| ११ | (३०८) | आयतन | घर |
| १८ | (१७७२) | आयस | लोखंड |
| ७ | (६८) | आया | साध्य, स्वाधीन |
| १८ | (९३६) | आयास | श्रम |
| १३ | (७२५) | आर | अजगर, अंकुर |
| १ | (११०) | आराइणें | अर्पिलेले असणे, अनुसरणारे असणे |
| ४ | (२४) | आरौतें | पूर्वी, अगोदर |
| १५ | (७५) | आऱ्हां | अलीकडे |
| १८ | (८१३) | आलोकी | प्रकाशात |
| ६ | (१३१) | आवगे | घेतो, येतो |
| १८ | (१६६०) | आवांका | विचार, अभिप्राय, सारांश |
| १३ | (२८) | आवारी | देखरेख करणारा |
| ९ | (१८२) | आवाळुवे | ओठाचे काठ, ओष्ठप्रांत |
| २ | (२५६) | आवृत | व्याप्त, व्यापलेले |
| ३ | (९) | आव्हाट | आडरस्ता, आडमार्ग |
| १६ | (५) | आसकड | अडचणीची जागा |
| १८ | (६०७) | आसका | संपूर्ण. |
| ११ | (४५३) | आसतुटी | निराश |
| १६ | (४२९) | आसलग | सोपे, अतिजवळ |
| १ | (१३०) | आस्फुरिणें | वाजविणे |
| २ | (१२३) | आहत | जोराने ताडन केलेली |
| १७ | (३६१) | आहवनियादि | गार्हपत्य, आहवनीय व दक्षिण हे तीन अग्नी. |
| २ | (१९६) | आहाणा | घातक, हानीस कारण |
| १३ | (२३५) | आहाळणी | ताप, त्रास |
| १८ | (१७७६) | आळियाडे | हट्ट, लळे |
| १८ | (१०३८) | आज्ञा | योगशास्त्रात सांगितलेले एक चक्र |

